ॐ

श्रीसमर्थ

# रामदास

( ऐतिहासिक पंचांकी नाटक. )

नाम चतुर्गुण पंचजुत द्विगुणित करबसु सेख ॥
रमे राम जायते रामदास कियो लेख ॥ १ ॥

संपादक

**लक्ष्मण नारायण जोशी**

**शास्त्री,**

तत्त्वविवेचक प्रेस—मुंबई.






श्री शालिवाहन शके १८२५.

**किंमत ८ आणे.**

# श्रीरामदास–नाटकावरील
## सर्वमान्य वर्तमानपत्रांचे
## अभिप्राय.

**काळ**—पुणें, शुक्रवार, आषाढ वद्य ७ शके १८२५.

हें पांच अंकी गद्यपद्यात्मक नाटक......आहे. शिवाजीचा आणि रामदासाचा काळ हा महाराष्ट्राच्या इतिहासामध्यें अत्यंत महत्वाचा आहे. राजकारण आणि देशभक्ति यांचा उदय त्या काळांत झालेला आहे. तेव्हां अशा भागाला अनुलक्षून लिहिलेलें नाटक हें आल्हादकारक आणि शिक्षणप्रद झालेंच पाहिजे. तुकारामाच्या अंगांत वेदांत होता आणि रामदासाच्या डोक्यांत वेदांत असून, राजकारणही भरलेलें होतें. हा जो रामदासाच्या अंगांत ऐहिक आणि पारमार्थिक गोष्टींचा मिलाफ झालेला होता, त्यापासून महाराष्ट्राचा कसा फायदा झाला हें ह्या नाटकावरून चांगलें लक्षांत येईल......एकंदरींत हें नाटक चांगलें साधलें आहे.

---

**श्रीसयाजी-विजय**–बडोदें, शनिवार, आषाढ वद्य ८ शके १८२५.

अलीकडे......संतमंडळीच्याच चरित्रांचे कथानक घेऊन त्यावर नाटकें प्रसिद्ध होऊं लागल्यानें व त्यांचे प्रयोग रंगभूमीवर लोकांच्या दृष्टीस पडत असल्यानें त्यांस आपल्यामध्यें, पूर्वी होऊन गेलेल्या महत्पुरुषांबद्दल जागृती उत्पन्न होत असून त्यांजविषयीं त्यांचा पूज्यभाव दृढ होत चालला आहे हें पाहून समाधान वाटतें. प्रस्तुत नाटक एकंदरीनें पाहतां बरें साधलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं......ह्या नाटकांत कित्येक ठिकाणीं दैविक चमत्कारांचा निर्देश करण्यांत आला आहे. ......ह्या नाटकाचा प्रयोग प्रसिद्ध शाहुनगरवासी नाटक मंडळी...... करणार आहे. त्यावेळीं समर्थांचें चरित्र अवलोकन करण्याचा लाभ प्रेक्षकांस होईलच. एकंदरीनें प्रस्तुत पुस्तक संग्राह्य आहे असें आम्हांस वाटतें.

---

**सुधारक**–पुणें, सोमवार, आषाढ वद्य ११ शके १८२५.

...... या नाटकांत......संविधानकाची मांडणी विशेष व्यवस्थित रीतीनें करण्यांत आली आहे......जेवढ्या मिळतील तेवढ्या दंतकथांचा नाटकांत संग्रह करण्याची हाव बाळगलेली दिसत नाहीं......या नाटकांत श्री रामदासांनी उपदेशिलेला 'महाराष्ट्रधर्म' काय त्याचें प्रसंगोपात चांगलें वर्णन केलें आहे. प्रायश्चित्तें, ग्रामण्यें, जातीभेद वगैरे आजच्या घटकेसही महत्वाच्या प्रश्नांविषयीं त्या साधुपुरुषाची मतें किती उदात्त होतीं याचें दिग्दर्शन नाटककारांनीं उत्तम केलें आहे. हें पुस्तक एकवेळ अवश्य वाचावें अशी आम्हीं शिफारस करितों.

---

**इंदुप्रकाश**–मुंबई, सोमवार, आषाढ वद्य ११ शके १८२५.

........ हें 'रामदास' नाटक आम्हीं वाचतांना...प्रयोगदृष्ट्या आम्हांस पुष्कळ चांगलें वाटलें...ठिकठिकाणीं खुषमौजेचे प्रसंग, मधुन मधुन तीं...'जोरदार' ठरलेली भाषा वगैरे प्रकार यांत ठीक आहेत. त्यांतून शाहूनगरवासी या नाटकाला नटविणार आहेत तेव्हां प्रयोगदृष्ट्या हें अति उत्तम ठरून लौकरच...चहूंकडे गाजूं लागेल यांत संशय नाहीं.........रा. जोशी हे चांगले लेखक आहेत. मराठी भाषेवर त्यांचें बरेंच परिशीलन आहे असें दिसतें व या नाटकांतील कांहीं भाषणें अशीं आहेत कीं, तीं वाचलीं असतां, नाटककारामध्यें, घटकाभर प्रेक्षकांना तल्लीन करून सोडण्यासारखी भाषा लिहिण्याची जोत प्रज्वलित आहे असा भास होतो. एकूंदरीनें नाटक बरें साधलें आहे. रा. रा. जोशी हे यापुढें अशींच ऐतिहासिक संविधानकें घेऊन नाटकें लिहितील व मराठी वाङ्मयांत भर टाकण्याचा प्रयत्न करतील अशी आम्हांस आशा आहे.

---

**केसरी**–पुणें, मंगळवार, आषाढ वद्य १२ शके १८२५.

...अलीकडे...साधूंचीं चरित्रें नाटकरूपानें लोकांपुढें आणून त्या द्वारें लोकांस सदुपदेश व मनोरंजन करण्याचें जें नवें वळण वाङ्मयास लागत आहे त्याचेंच हें नाटक...फळ आहे. ऐतिहासिक किंवा काल्पनिक कथानक घेऊन त्यावर नाटकें लिहिण्यापेक्षां साधूंच्या भक्तिरसपूर्ण व प्रेमळ चरित्रास उत्कृष्ट नाटकरूप देणें फारच कठीण किंबहुना दुरापस्तच असून त्यांची शांती, भक्ति, प्रेमळपणा व वैराग्य याचा हुबेहुब ठसा पुस्तकांत किंवा रंगभूमीवर उत्कृष्ट रीतीनें वठविणें तितकेंच दुर्घट आहे...लोकाभिरुचीस वळण लागतें...अशा दृष्टीनें रा. जोशी यांचा हा प्रयत्न स्तुत्य असून तो त्यांस...बरा साधला आहे.

---



श्रीमंत

राजराजेश्वर सयाजीराव गायकवाड,

सेनाखासखेल–समशेरबहाद्दर, संस्थान–बडोदें.

# अर्पणपत्रिका.

वसंततिलका.

श्री-शब्ददेवि वसति स्थलिं एक राया ॥
सख्यें तवालयिं जगीं कुतुका कराया ॥
याष्टीक ईश्वर-दयें सुयशीं वसे तूं ॥
जीवा-समान, वरुनी यश राम-सेतू ॥ १ ॥
राज्याश्वसूत्र बहु चाळिशि नेटकें तें ॥
जायु प्रजाहित मनीं म्हणुनी टिके तें ॥
सन्मान तो विधिसुतेप्रति फार देशी ॥
राजीव-गंधसम विस्तरुनि स्वदेशीं ॥ २ ॥
मस्तिष्क तीव्र तव राज-धुरि स्वमानीं ॥
दार्ढ्यें धरूनि वहसी सविता-श्रमांनीं ॥
सत्सार तूं स्वजन-दुःख सदां हरीशी ॥
गुर्वर्थ-मूर्ति उपमेय तुझी हरीशी ॥ ३ ॥
रुक्मांग-आंग्ल-मुगुटांत सुरम्य रत्नें ॥
राजस्वरूपिं खचलीं असति प्रयत्नें ॥
जन्हूपरीस यश घेउनि तेथ बैसे ॥
चित्तप्रसन्नति तयांमधि दिव्य ऐसे ॥ ४ ॥
राकाच वाङ्मय-नभांत सुरम्य जैशी ॥
युक्तकृती मम तुझ्या हृदिं होउं तैशी ॥
कल्याण-रुंजि नटवी तुज अर्पणाला ॥
रोलंबशा तव पदांबुजिं लक्ष्मणाला ॥ ५ ॥






# प्रस्तावना.



There comes a voice that awakes my soul. It is the voice of years that are gone: They roll before me with their deeds.

Ossain.

धर्मसंस्थापनार्थाय ।
संभवामि युगे युगे ॥
गीता

कृतेतु मारुताख्याश्च त्रेतायां पवनात्मजः ॥
द्वापारे भीम संज्ञश्च रामदास कलौयुगे ॥१॥
भविष्यपुराण.



जगांतला स्वजन्माचा ईश्वरीसंकेत ओळखून, ब्राह्मीस्थिति प्राप्त करून घेण्याच्या भौतिक मार्गाच्या शिखरास जाऊन पोंचले असतांही, स्वदेशबांधवांची पारतंत्र्यांतून सुटका करण्याकरितां, स्वराज्य आणि स्वधर्मजागृतीच्या उपजतबुद्धीला जोरानं वाढण्यास महाराष्ट्रललामभूत श्रीशिवछत्रपतीच्या पराक्रमाची जोड घेऊन, स्वधर्मजागृतीनें करविणारा श्रीसमर्थ रामदासांचा विजयी–ब्रह्मचारी

मारुती सर्व आर्यावर्तावर भुभुःकार करून उड्डाणें मारीत हिंडल्याला आज तीनशें वर्षें होत आलीं—त्याची साक्ष—इतिहास, दंतकथा आणि वैभवहीनतेनें व पतिपराङ्मुखतेनें भ्रष्ट होऊन, जमीनदोस्त होऊं पाहणारे किल्ले, मंदिरें, तट, राजवाडे वगैरे जे देत आहेत त्यांच्याच खऱ्या वैभवशाली स्वरूपाचा आणि त्यांत नांदणाऱ्या महाराष्ट्रलक्ष्मीचा—प्रकृत पुस्तक हा स्वच्छ आरसा आहे.

दृढनिश्चय, बाहुबल, पातिव्रत्य, अटोकाट धोरण, मराठ्यांच्या अतुल प्रतापाचे झेंडे, मुसलमान रणशूरांची हबेलंडी, ज्याचा त्याला धर्म प्यारा असणारें तत्व, यवनांना रामभक्त करून अहंकाराची गर्दनछाट करणें, प्रपंचांत राहून परमार्थ करण्याची अजब युक्ति, साम्राज्याची उदात्त कल्पना, जशास तसें वर्तन ठेवण्याची शैली, अंधपरंपरेच्या रूढींतील कर्दमाची शास्त्रान्वयें ऊरफोड, विकट प्रसंगीं न डगमगतां स्वदेश आणि स्वधर्मासाठीं प्राण तृणवत् मानण्याचें क्षात्रतेज, गनीमीकाव्याची लढाई, विजयश्रीचा विजयी स्वयंवर, स्वधर्म आणि स्वभाषा यांस उन्नती देऊन, स्वराज्यस्थापनेची कर्तबगारी, सेवाधर्माचा कित्ता—वगैरे बऱ्याच मुद्यांचें प्रकृत पुस्तकांत खुलासेवार स्पष्टीकरण केलें असून 'आमचे पूर्वज असे होते' असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न करण्यास श्रीसमर्थांच्या ग्रंथांची आणि छत्रपती शिवराजांच्या इतिहासाची संगतीच मुख्य कारण झाली असल्यामुळें, ह्यांत जें कांहीं आहे तें समर्थांच्याच कृपेचें फळ आहे. कारण, समर्थ काय करणार नाहींत? आनंदमूर्ती म्हणतात—

**श्लोक.**

**समर्थ हें नामचि साच मानूं ॥ समर्थ हें नाम दुज्या न मानूं ॥**
**समर्थ—कृपेनें जडजीव तरती ॥ समर्थ हें नाम सद्यः प्रचीती ॥**

ह्या पुस्तकांत आरंभापासून आखेरपर्यंत बोलण्याची प्रचारांतील भाषा वापरली असून, नाटकारंभापासून दुसऱ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशापर्यंत, सतराव्या शतकाच्या प्रारंभींची आर्यभू कशी होती आणि तींत कसें बीज रुजत होतें हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. रंगभूमीच्या सोयीकरितां दुसऱ्या अंकाचा पहिला प्रवेश पहिल्या अंकांत सामील

केला असून, त्या ऐवजीं पहिल्या अंकाचा दुसरा प्रवेश, तो वाचकां-करितांच असल्यामुळें, प्रयोगांतून गाळला आहे आणि तिसऱ्या अंकाचा पहिला प्रवेश दुसऱ्या अंकाच्या शेवटीं घेतला आहे. नाटकारंभींच जें नानक म्हणून शीखांच्या गुरूचें पात्र ह्या पुस्तकांत घातलें आहे, तें चुकीनें घातलें गेलें असून, ती चूक पुस्तक छापल्यानंतर लक्षांत आली. तें पात्र श्रीनगर येथील शीखधर्माचा एक गुरु असें समजावें. नाटकाच्या रचनेच्या सोयीकरितां इतिहासाच्या संगतवार गोष्टींनां मागें पुढें कराव्या लागल्या आहेत.

आतां शेवटीं वास्तविक म्हणायचें तें हें कीं, ज्याप्रमाणें वाऱ्यानें झाड हालत असतां जमीनीवर उठणाऱ्या छायेच्या निरनिराळ्या आकृती बघणारा स्वभावजन्य कवि–स्वमताशींच कवित्व करूं लागतो, त्याचप्रमाणें माझ्या लेखणीला ज्या शक्तीच्या कृपेनें कागदावर डोलण्याची शक्ति येऊन, श्रीसमर्थ रामदासांच्या ऐतिहासिक कथाभागांचीं चित्रें जगापुढें मांडण्याचें धारिष्ट झालें तें सर्व त्याच श्रीलक्ष्मीनारायणार्पणमस्तु.

श्रावण शुद्ध १<br>शके १८२५<br>मुंबई.

**ल. ना. जोशी.**

---

## आभार.



पूर्वीं भोजराजाच्या दरबारांत कोणी नवीन कवित्व घेऊन गेला असतां, त्याच्या योग्यतेप्रमाणें त्याची संभावना होत असे. हें जसें आपणांस वाचण्यास मिळतें, त्याच-प्रमाणें सद्य:कालीं ही गोष्ट गायकवाडींत आपल्याला अनुभवितां येते. श्री.राजराजेश्वर **सयाजीराव महाराज गायकवाड**, सेनाखासखेल, समशेरबहादुर–संस्थान बडोदें–ह्यांच्यांत जे कित्येक अमोल गुण आहेत त्यांतच–विलक्षण विद्याभिरुची आणि दानशौंडता हे दोन गुण विशिष्ट असल्यामुळें कवी-

कारागीरांचे ते आश्रयस्थान झाले आहेत. ह्याचा अनुभव, ह्याच पुस्तकाच्या वेळीं मला स्वच्छ आला हें म्हणण्यास मोठी प्रौढी वाटत आहे.

एकंदर थोड्या अनुभवावरून ह्या संस्थानची व्यवस्था, अती टापटीपीची, पद्धतशीर, सरळ आणि न्यायाची आहे हें म्हणणें कधींही अतिशयोक्तीचें होणार नाहीं. असो.

प्रकृत पुस्तक समर्थकृपेनें महाराजांच्या आज्ञेवरून महाराजांच्या आश्रयाखालीं महाराजांसच अर्पण करण्याची मला जी परवानगी मिळाली, तीबद्दल मी **श्रीमंतांचा** अतिशय आभारी असून, माझ्या देशबांधवांतील कांहीं उत्तम परंतु दुर्दैवानें पडद्याआड पडलेल्यानां आणि आले तसे गेले-अशी स्थिति होणाऱ्यांना मजप्रमाणेंच महाराजांनीं आश्रय देऊन, नव्या नव्या ग्रंथरचनेस प्रोत्साहन द्यावें अशी विनंती करून दुसरीकडे वळतों.

हें पुस्तक लिहिण्याची सुरवात शके १८२४ च्या माघ शुद्ध पक्षांत झाली. हें पुस्तक लिहिण्यास मला उद्युक्त करणारे शाहूनगरवासी नाटक मंडळीचे मालक व स्वभावसिद्ध नट रा. रा. गणेश कृष्ण जोशी आणि कृष्णाजी महादेव जोग हे होत. रंगभूमीवर प्रयोग करण्यास लायक होईल अशी नाटकाची प्रत तयार करण्याच्या कामीं ह्या दोघांनीं मला ज्या सूचना केल्या आणि हें माझें नाटक रंगभूमीवर आणण्याचें त्यांनीं मला जें अभिवचन देऊन, पुणें मुक्कामीं प्रथम प्रयोग करण्यानें ते पुरें केलें, त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आणि आभारी झालों आहें.

**पुस्तककर्ता.**

# Ramdas

has been depicted by

The Late Worthy

**Mr. M. G. Ranade**

**in the following words.**



*y the influence of* **Ramdas** *and* **Tukaram** *the national sentiment was kept up at a higher level of spirituality and devotion to public affairs than it would otherwise have attained. In token of the work of liberation being carried on, not for personal aggrandisement but for higher purposes of service to God and man, the national standard received, at the suggestion of* **Ramdas** *its favourite orange colour, which was and is the colour of the clothes worn by anchorites and devotees. The old forms of salutation were dispensed with as implying submission to the foreigner, and a new form was substituted, which only recited the name of* **Ramdasa's** *deity. Under the same influence the names of* **Shivaji's** *principle officers were changed from their Mahomedan designations to Sanskrit equivalents, and the forms of correspondence also were similarly improved.* **Shivaji** *from a sense of gratitude to his spiritual teacher, made a gift of his kingdom, and* **Ramdas** *gave it back to him as a trust to be managed in the public interest.*

# नाटकांतील पात्रें.

| | |
|---|---|
| गंगाधरपंत श्रेष्ठ .... ... | समर्थांचे वडील बंधु. |
| श्रीरामदास .... ... .... | महाराष्ट्रराजगुरु. |
| शहाजी .... .... .... .... | राजपिता. |
| श्रीशिवाजी ... .... .... | महाराष्ट्रराज्य-संस्थापक. |
| संभाजी.... .... .... ... | युवराज. |
| निळो सोनदेव, बाळाजीआवजी, जिवा म्हाल्या .... } .... ... | राजसेवक |
| उद्धव, कल्याण, जयराम, वामन-पंडित, सदाशिवशास्त्री देव, अक्का, वेणु, } ... | समर्थांचे शिष्य आणि शिष्यिणी. |
| बेषखखान, दलेलखान } .... .... .... | मुसलमानी अधिकारी. |
| मिरासाहेब .... .... ... | मुसलमानी साधु. |
| राणुबाई .... .... ... .... | समर्थमाता. |
| जिजाबाई ... .... .... | राजमाता. |
| सईबाई .... .... ... .... | राजभार्या. |
| चंद्राबाई .... .... .... .... | निळो सोनदेवाची पत्नि. |
| गिरजाबाई .... .... .... | बाळाजी आवजीची गृहिणी. |

दादोजी कोंडदेव, गंगाभट्ट, शिष्य, अष्टप्रधान, भूषणकवी, रघुनाथाध्वरी पंडित, नानक, भालदार, सैनिक, तुक्या भिवाजी, त्रिवेंकटाचार्य, सैनिक, खाटिक, बहिरु महार, गुराख्याचें पोर वगैरे इतर पात्रें.




ॐ

श्रीसमर्थ

# रामदास नाटक.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

( श्रीनगरांतील एक रस्ता. नानक प्रवेश करितो ).

**नानक**–इस उर्झ मेझेपर फल्ककी जो सफेद चद्दर नझर आती है, उसपर अलम दुनिया इंदरजालके मुआफिक, अम्रेहि मजेमे गिरफ्दार होके, कित्येक बार, फेर इस दुनियामें पैदाष करनेवाले प्यार और चन्न, यह दोनोमें मजा लेके, दंग हुवेसे नजर आते है! लेकिन् आप कोन, कहांसे आये, जानेका कहां, पैदाषत् किसवास्ते हुयी और करना क्या मंजूर है, इस बातका ख्याल करनेमें, कुई अझी मष्गूल है, ऐसा दिखता नहीं. जिस्को अप किचर-चहला मानते है, इस्मेहि अम्रा बेख हूलके, उस्मेसेहि सिर्फ मुबूरा खेंचके, अपनी खुबसूरति और खुषबू इस दुनियाके वास्ते हवा पैगंबरके साथ बिछानके, महसूलदार शदकी मूखीके तरफसे इस दुनियाके खुषीके लिये शदके हौजे करनेवाले कुनवुलों, जिस मुआफिक दिलदारीसे दुनियेपर ऐह्स-सान करते है उस मुआफिक, कुदूरतसे बनेहुवे मुलामत् बदनसे दुनियामैलेमेके अच्छे तसूव्हर यह दुनियामें रख्के इन दस्तोंसे दुनियाके लिये अच्छी कर्तबगारी बनाना बेषक जुरूर है! अम्रा बदन भला चंग है! मनमजबूतीरो दिल मुआफिक बनालेंगे,

ऐसी बाते सब बनाते है; लेकिन् कुनवलोके डालीका छिलटा खेंचनेको जैसा अपको बिलकुल वख्त और ताकत जुरूर नही उसतऱ्हे यह वदनकुनवलोके डालीका जानसूत खेंचनेको परमहंस भगवत्को कितना देर लगेगा? इसवास्ते खुदमतलब भगवत्के–नाहिंजार बाते छोडके हुजूरके इबादतसे बदन घसाया तो क्या मुफ्त होगा? कई मतलबे तूखम रीझते है! लेकिन् उस्की नीगा रख्ते बात वोह जैसे मुफ्त जाते वैसाहि यह बदनका है! यह बदन अच्छेके वास्ते इस दुनियामे पैदा होता है! लेकिन् तमियत अमोझ वगर सच्चा नसीहत उस्को पाता नहीं, और मनमे घूमनेवाले सब विचार रास्ता मालुम न होनेसे एक जगेपे खामोष होते है! बिलकुल यह बात हमारी होनेसे आत्मानात्म विचारका पता लगता नहीं. अलम हिंदुस्तान धूंडलिया, लेकिन् सच्चा रास्ता बताके मनको आराम देनेवाला एकहीं उस्ताद अभीतक मिलता नहीं. उस्ताद तो चहिये! लेकिन् मिलता नहीं. फौरन महाराष्ट्रमे पैदा हुवे है जो बजरंगके मुजूसम रामदास नामका दर्जे अवल बेरामन साधु वोह् तीरथ जात्रा करते करते यह् श्रीनगरके पहाडमे मुकरर हुवे है ऐसा समज आया है. उस्का दर्सन लेके वोह् कोन्से दर्जेका है यह देखना चाहिये. (पडद्यांतून श्लोक ऐकू येतो).

**श्लोक.**

**जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ॥**
**कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी ॥**
**प्रभूदक्ष व्युत्पन्न चातुर्य जाणें ॥**
**तयाचे नियोगे समाधान बाणें ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ! (उद्धव पडद्याबाहेर येतो.)

उद्धव–अहाहा! ह्या रामनामाचा महिमा किती अतर्क्य आहे! ह्याच रामनामानं शंकराला हलाहल वीष पचवतां आलं!

ह्याच रामनामाचा तिरस्कार रावणानं केला म्हणून तो अधोगतीला गेला.

**श्लोक.**

**मुखीं राम त्या काम बाधूं शकेना ॥**
**गुणीं इष्ट धारिष्ट त्याचे चुकेना ॥**
**हरीभक्त तो शत्रु कामास मारी ॥**
**जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ॥ २ ॥**

आत्मारामाचं दास्य करण्यास वायूपुत्र हनुमान सदा तत्पर असल्यानंच निर्विकार आणि अनंत अशा रामानं आपल्या ठिकाणीं वायुपुत्राचं दास्यत्व जाणून त्याला चिरंजीव करून सोडला. म्हणूनः—

**श्लोक.**

**बहू चांगलें नाम त्या राघवाचें ॥**
**अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें ॥**
**करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें ॥**
**जिवां मानवां हेंचि वैकल्य साचें ॥ ३ ॥**

जें नाम ऐकल्याबरोबर सहस्र पापं जळून खाक होऊन, मतिमंदही साधनास योग्य होतात आणि ज्ञानवैराग्यसामर्थ्य अंगीं येऊन जर मुक्तिभोग प्राप्त होतो तर, तें फुकट मिळणारं नांव कां न घ्यावं! (पाहून) ओहो, अरुणकांतीनं भासमान होणारा हा चित्रविचित्र रक्तवर्ण गालिच्या तुडवून क्षितीजावरील अंधःकाराचा पराभव करणारा सूर्यनारायण बराच वर आला. तर आतां हीं फुलं घेऊन लवकर समर्थांच्याकडे जावं! ( जाऊं लागतो व त्यास **नानक** भेटतो. )

**नानक**—आप कोन हो? यह फूलोंकि दूलिया हांतमें पकडके-लिवाज भगवा करके आप कहां जाते है? बिगर अख्त्यार यह पूछते है उसवास्ते मुआफ करो.

**उद्धव**–ह्या देहाचं मूळचं नांव जरी भिन्न आहे, तरी श्री समर्थ रामदासांच्या कृपादर्शनानं पवित्र झाल्यापासून ह्या देहाला त्याच कृपाछत्राकडून उद्धव असं म्हटलं जातं! ज्या अर्थी आपल्याला माझं नांव कळलं त्या अर्थीं आपलंही नांव कळवून घेण्याची मला बुद्धी व्हावी हें साहजिकच आहे.

**नानक**–हिंदू और मुसलमीन यह दोनो धरमका मिलाफ करके सीखका धरम जो गुरु नानकनें मुकरर किया है उसके मसनदीपे जो अभी कुई है वोह् हम् है; हम् अपने धरमकेलिये बडी तश्रीफ लेताहै; लेकिन मौखूल या ठीक उस्ताद अभीतक हमे मिलता नहीं. उसवास्ते रंगबुरंगीके घेरेमे गिरफ्दार होके अपना और दूसरेका रू इस्की जो वाक्फियत जिस्को अप आत्मानात्म बिचार कहते हो उस्का शिखर देखनेको मै बेमख्दूर है!

**उद्धव**–ह्या गोष्टी समर्थांच्याच कडून कळवून घेतल्या शिवाय कळत नाहींत.

**नानक**–श्रीरामदास तो बडे मुंजूमिद उस्ताद है! ऐसी खबर है! इसलिये हमारे मनसुबे मुआफिक हमको सब समजाके वोह् अपके मुंजूमिद नामको मख्दूर होगे क्या?

**उद्धव**–ज्या प्रमाणें परमेश्वर हा परमेश्वर ह्या नांवाला पात्र आहे तसेच तेही समर्थ आहेत.

**नानक**–उस्के रूबरू यह बदनको आप लेजाइंगे तो बडी मेहेरबानी होकर आप दुवेदार होगे!

**उद्धव**–कोण कोणाला नेणार?

**नानक**–हमको अप!

**उद्धव**–मी कोण? ज्याला जशी स्फूर्ति होते तसं तो करतो.

श्लोक.

मना संग हा सर्व संगासि तोडी ॥
मना संग हा मोक्ष तात्काळ जोडी ॥
मना संग हा साधका शीघ्र जोडी ॥
मना संग हा द्वैत निःशेष तोडी ॥ ४ ॥

जयजय रघुवीर समर्थ!

( उद्धवा मागून नानक जातो. )

( रामदास कड्यावर हिंडत आहेत असा प्रवेश उघडतो. )

रामदास— श्लोक.

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ॥
दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ॥
विचारी मना तूंचि शोधूनि पाहे ॥

जयजय रघुवीर समर्थ!

अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार–अशीं जीं ह्या देहांतील अदृश्य पंचतत्वं आणि प्रभंजनाचे अंश जे पंचप्राण ते मिळून बाकीच्या ह्या देहांतील ज्या पंधरा मात्रा त्यांस विषय विलास असतात; परंतु असे पंचवीस प्रकार मिळून जो हिरण्यगर्भ झाला त्याची मातृका उकार असून अभिमानी विष्णु आहे. ह्या स्थितिअवस्थेचा प्रतिपाळ तोच करतो. आणि म्हणूनच धर्मरक्षणाकरितां त्याला अवतार घ्यावा लागतो. त्या प्रमाणें, सध्यां–ह्या देशभर जो अधर्म होत चालला आहे त्याचं खंडण करण्याकरितां, त्यानं अवतार धारण केला असून, कोठें काय काय चाललं आहे त्याचं ह्या तीर्थयात्रेच्या मिषानं अवलोकन करून, जागोंजाग आर्यधर्माची स्थापना करण्यास त्यानं जी आम्हांला आज्ञा केली आहे तिच्या प्रमाणं, ह्या देहांतील आत्मा

बारावर्षांत तेराकोट पुरश्चरणानं वज्रवत् करून, आतांपर्यंतच्या प्रवासांत चारशें पेक्षां जास्त रामदासी मठ स्थापन केले. आणि आतां ह्या प्रांतांतील शीख धर्मालाही स्वधर्माची मात्रा पाजून स्वजनहिताकारितां आपल्याकडे वळवून घेण्याचा जो विचार आहे तो सिद्धीस गेला म्हणजे दक्षिणेंत जाण्यास कांहींच हरकत नाहीं. ( ऐकलेंसें करून ) अँ, श्लोक ऐकूं येतो आहे! उद्धवच आला खास! सांगितलेली कामगिरी करून आला वाटतं.

( पडद्यांत ) **श्लोक.**

**नव्हे पिंड ज्ञानें नव्हे तत्व ज्ञानें ॥**
**समाधान कांहीं नव्हे तान मानें ॥**
**नव्हे योग योगें नव्हे भोग त्यागे ॥**
**समाधान तें सज्जनाचेनि योगें ॥**

जयजय रघुवीर समर्थ! ( **उद्धव** येतो ).

**उद्धव**–शीख धर्माच्या गादीवर सध्यां असलेले शीखगुरु समर्थदर्शनार्थ आले आहेत.

**रामदास**–चला आपणही त्यांच्या दर्शनाला जाऊं!

( पुढें होतात इतक्यांत दोघांची गांठ पडते. )

**नानक**–जिस नकबे कोयलेकी पैदाषत होती है उस्मेही रतन पैदा होते है ऐसे कहते है!

**रामदास**–महोदधीसारखा बाप, चंद्रासारखा भाऊ, प्रत्यक्ष लक्ष्मी बहीण, मेहुणा द्वारकाधीश कौस्तुभधारी गोपालकृष्ण, असं गोत असतां, शंख दारोदार भिक्षा मागतो हें खरं आहे.

**नानक**–उस्का सबब जनम खुसलते विगर क्या है?

**रामदास**–येथेंच चुकतं! स्वभाव संगतीनं बनतो. आणि तुम्हांला जें कांहीं हवं आहे तेंही संगतीनंच प्राप्त होणार आहे.

**नानक**—लेकिन ऐसी रिफाकतका अशकारा नहीं होता उस्को क्या करे!

**रामदास**—आधीं संत ओळखून त्यांच्या समागमानं अंगीं साधेपणा आणावा लागतो. तो साधेपणा पूर्ण दशेला पोंचला म्हणजे साधूपणा येतो. आणि नंतर जें आपल्याला पाहिजे तें मिळतं.

**नानक**—( पायां पडून ) अपनेको सीखका गुरू याने उस्ताद कहेनेवाला वोह् नानक उस्केहि वास्ते अपने पांवकी बंदगी बजाता है! इस्को रंगबुरंगीके घेरेमेसे छुडाके, अपना और दूसरेका रू इस्का एकही रू करनेकी वाक्फियत समजाके मुक्लसीका मकान बता देना इतनाही अरज अपके कदमके पास है!

**रामदास**—तो पलीकडे तुटका कडा दिसतो आहे त्यावरून खालीं उडी मारा म्हणजे तें स्वरूप दृष्टीस पडेल.

**नानक**—कडिया कूद लेनेसे इस बदनका माम्ला आखर हुवाके, यह चष्म—वोह मुक्लसीका मंदिर देखनेको जिंदे कैसे रहेगे?

**रामदास**—हाच विचार जोंपर्यंत तुमच्यासारख्या साधु म्हण-विणारांच्या हृदयांत आहे तोंपर्यंत तुम्हीं ज्याचा शोध करीत आहांत तें तुम्हांला प्राप्त होणं कठीण आहे. ह्या देहासारखे आत्म्याला दुःखभोग नसून तो अविनाशी आणि अविकारी आहे. त्याचीच प्रथम ओळख करून घेतल्याशिवाय आत्मा-नात्म विचार कळणं कठीण आहे.

**नानक**—वोह् देखनेका रास्ता देखके, आपका गुरुपदेश लेनेको मै यह जगे हजीर हुवा है! उस्के लिये तवाजीजू यानें शफकत करना!

**रामदास**—ह्या जिव्हेपासून जगांत आजपर्यंत अनेक तत्वरूप रत्नं जरी जन्म पावलीं आहेत, तरी त्या सर्वांत जें एकच मुख्य तत्व आहे तेंच शुद्ध जाणावं. ॥ नाना तत्वें लहान थोर ॥ मिळोनि अष्टही शरीर ॥ अष्टधा प्रकृतीचें नीर ॥ निघोनी जात ॥ ज्या प्रमाणें हवा नसतां गगन त्याचप्रमाणें परब्रह्म सघन होय. त्यावरूनच अष्ट देहांचं निरसन करून पहावं. ब्रह्मांड पिंड उभारतो आणि संहारतो. ह्या दोन्ही स्थितींपेक्षां ब्रह्म भिन्न असून तें विमल आहे. पदार्थमात्र जड असून आत्मा चंचळ आहे; परंतु विमल असं जें ब्रह्म तें निश्चळ असून, ॥ विचरोनि विवरे तत्काळ ॥ तद्रूप होय ॥ पदार्थ, मन, काया, वाचा, मी, तूं—सर्व कांहीं देवाचं आहे—असा जो विचार तेंच आत्मनिवेदन. प्राणीमात्रांमध्यें दिसणाऱ्या चंचलतेचा जो कर्ता, त्याचेच प्राणीमात्र जरी अंशभूत आहेत, तरी त्याचा ठाव कोठें लागत नाहीं. चंचलता ही स्वप्नाकाराप्रमाणें असून, निश्चळ देव निराकार आहे. जेथें चांचल्यासच ठिकाण नाहीं तेथें आधीं आपण आणि तूंपण कोठून येणार? जेथून मीपणा गेला तेथें भांडण्यास दुजा भाव कधींही राहत नाहीं. सर्व तें आपण आणि आपण तें सर्व असा भास मात्र राहिला. लहान मुलं दगड मांडून देव म्हणून एके जागीं पुजतात, किंवा पाणी भरलेल्या घटांत सूर्यचंद्रादिकांची बिंबें पाहून ते देव घरांत सांठवले आहेत असं म्हणतात, परंतु तो जसा भास—त्याचप्रमाणें अंधेराचा जरी मोठा ढीग पडलेला असला तरी त्यावरून जाणारास जसं आकाश आडवीत नाहीं, तद्वतच आत्मज्ञानाला भेटण्यास जाण्यास जे अडथळे दिसतात ते आभास असून, त्यांना तुडविलं कीं, मग अंतीं जें सुख व जी शांती होते—तेंच तें होय.

**नानक**–ओहो, सद्गुरु मूंसे हुवा जो अमृतकी बरसात–उससे बदनका हुवेला बबूला ठंडा होके गोशगुऱ्हासे यह सीरमे घूसके उसे झक अज्वालेसे यह नझर सफा जैसी रोषनी होनेसे, वोह् जो कुछ नझर आता है, सो, और यह बदन एकही है ऐसा समझ होके, यह सब करनेवाला इस्मेसे दूसरा जो कुई है वोह् भगवत् होके, यह अलमदुनिया उस्का कबीला है! बस्स हुवा अभी! आगे मनमे हौजे कियेले सब बिचार छोडके पहाडमें जाके आत्मानंदमें मष्गूल होगा. उस्तादजी, मेरेऊपर ऐह्यसान करना!

**रामदास**–तुम्हांला पूर्वींच अनुग्रह झालेला आहे. आतां वेगळा नको.

**नानक**–और मतलब ठिकानेको उस्तादका मकान मैं मानताहूं. उसलिये हमारे ऊपर इनायत करना.

**रामदास**–अनुग्रहाविषयीं दुराग्रह करूंनये! कारण एकवार अनुग्रह झाला असतां, दुसरे वेळ घेऊंनये अशी शास्त्रमर्यादा आहे. तथापी तुमची मरजीच आहे तर श्रीरघुपतीची उपासना करावी म्हणजे झालं.

**नानक**–वोह उपासनेका रास्ता खुला बताये बिगर अंदर घूसना मुष्कील है!

**रामदास**–श्री रघुपतीच्या उपासनेचा जगद्वंद्य मार्ग परंपरेनं चालत आलेलाच आहे. तेव्हां तो दाखवायला ह्या रामदासाची जरूरी नाहीं.

**नानक**–तुवातूरे बहोत रास्ते खुले है! लेकिन वोह रास्तेमेका बराबर सच्या रास्ता बतानेवाला उस्ताद मिले बिगर शागीर्दको, शागीर्द यह नामका फायदा न मिलनेसे उस्की दौर खामोष होती है! इसलिये उस नानकको अप्ना शागीर्द करके उस्को वोह रास्तेमे दौर करनेका सुबेल बताके इस हाथसे खिदमत लेना.

**रामदास**—श्रीचं शिष्यत्व पतकरण्याचा तुमचा इरादा दिसतो आहे. उत्तम आहे. उद्धवा, पूजेचं सहित्य आण! ( नानक पूजा करतो. स्वामी त्याला भगवीं वस्त्रें देऊन उपदेश करतात.) नानकजी, कामक्रोधमत्सरादि षड्रिपु अंतःकरणांत जागृत होऊन, जसजसे बळावत जातात तसतसं द्वैताचं प्रस्त वाढत जातं व तें इतकं वाढतं किं, जें कांहीं करायचं तें आत्मसुखार्थ. ह्यांतच त्याचं पर्यवसान होतं. जगांत जे अनेक अन्याय घडतात, अपराध्यांनीं तुरुंग भरतात, रक्ताच्या नद्या वाहतात, हाडांच्या राशी पडतात, सहस्त्रावधी धर्मपत्न्या विधवा होतात, लक्षावधी निरपराधी मुलं पोरकीं होतात—त्यास आदिकारण हें द्वैतच त्याहे.

**नानक**—यह रंगीबुरंगीनें सब अझीयोका दिल घेरनेसे जहां देखें वहा टंटा शुरू है! यह् बडा जालम जहर है! अझीम अझरपर बडे हकीमने जैसी दवाई धूंड निकलवाई है:—

**रामदास**—त्याच प्रमाणें ह्या मानसिक रोगावर महात्म्यांनीं, विचार—विवेक—ह्या औषधी योजून ह्याचं निवारण होईल असं केलं आहे. मुख्य साधन भावना चांगल्या आणि दृढतम होणं हींच गोष्ट ह्यांत मुख्य आहे. मनुष्य कितीही दुष्ट आणि स्वार्थवादी असला, तरी त्याचीं कुटुंबांतलीं माणसं त्याला जशीं आत्मवत् वाटतात, म्हणजे त्याच्या कुटुंबांत त्याच्या द्वैताचा अंतर्भाव होतो—हीच स्थिति राष्ट्रासंबंधानं राजाची आहे. राजाच्या मनांत त्याच्या कुटुंबाच्या बाहेरच्या माणसांचा जसा समावेश होतो तद्वतच राजगुरूचा अंतर्भाव राजासकट राष्ट्राचा होतो. आर्य आणि महंमद ह्या दोन धर्मांच्या एकीकरणाचा जो तुमचा शीख धर्म तो जर सध्यां तुम्ही राजगुरू म्हणवून चालवीत आहांत तर तुम्हींच तुमच्या राष्ट्राचे अंतर्भाव ठरत आहांत.

**नानक**—और, आप जो हमारे उस्ताद है तो हमारे साथ हमारे सीख कौमका अपही भीतरला दिलसोझी ठैरे.

**रामदास**—ह्यावरूनच आतां सहजच लक्षांत येईल कीं, मनुष्य पूर्ण द्वैतवादी झाला म्हणजे तोच अद्वैतवादी ठरतो. आणि ह्याच अद्वैताच्या सुखाचं चिन्ह आत्म्याची पवित्रता हें होय.

**नानक**—अभी हमारा रू जो अप—हमारे उस्ताद ठैरे, उस्के पाक दिलका यह भगवा लिवाज आज हमको मिलके रूकी वाक्फियत हासल हुई; लेकिन, जिस्के पाससे वोह् बिनमोल खजाना मिल्गया उस्की अलामत याने निशानी—जिस हमारे सीख धरमको सच्या रास्ता बताके पाक किया उस्के सरपर रहना जुरूर है—ऐसा मेरा इरादा है! इसलिये और यह बदन, रामदास समर्थके पांवके शागीर्द है, यह् दुनियाको दर्याफ्त होनेके लिये कुईतबे चीज मिलना चाहिये. (रामदास अंगावरील छाटी काढून देतात.)

**रामदास**—जोंपर्यंत तुमचा शीक पंथ कायम आहे तोंपर्यंत तुमच्या अमृतसरच्या मुख्य देवालयाच्या शिखरावर ह्या छाटीचं भगवं निशाण ठेवून, ही कुबडी (कुबडी देऊन) व ह्यांतील हा सळ, हेंच तुमचं दैवत असं तुम्हीं समजावं.

**नानक**—उस्के लिये गुरुदच्छना क्या देना?

**रामदास**—आर्यधर्मसंरक्षकांशीं, अद्वैतानं वागण्याच्या कबुलायतीनं, आम्हांला गुरुदक्षिणा पावेल.

**नानक**—आर्योंका वैदिक धरम और हमारा सीख पंथ इस्का भीतरला दिलसोझी—अपसे एक हुवा है! उस्के लिये आज दीनसे आर्योंके वास्ते हम अम्रा दिल् बिरादर मुआफ्क करके, अपना बंदा शागीर्द इस नामसे इस दुनियामें आरामसे ठैरा अम्रा काम करेगा!

उद्धव— **श्लोक.**

समर्थाचिया सेवका वक्र पाहे ॥
असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥
जयाची लिला वर्णिती लोक तीन्हीं ॥
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ. ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

( विजापुरांतील **राजे शहाजी** यांच्या घरापुढील रस्ता. **चार मुसलमान खाट**-कांनीं धरलेला व ज्याची तरवार रक्तानं लाल झाली आहे असा **शिवाजी** येतो.)

**शिवाजी**—हरामखोरानों, सोडा मला! ह्या आर्यभूमातेवर गोवध करता काय? चोरानों, परक्याच्या देशांत घुसून, चोरट्या टोळधाडी प्रमाणें आमचा फन्ना उडवूं पहातां होय? चला-सोडा-दूर व्हा! नाहींतर, ही बालरवीप्रमाणें आपली रक्तप्रभा फांकविणारी ह्या शिवाजीची तरवार, उष्णतेचा ताप सहन न झाल्यामुळें, भुंगा जसा कमळाची कळी वरून फोडून थंडाईकरितां आंत घुसतो, त्याप्रमाणें जबरदस्तीनं तुमच्या काळजांत घुसेल—हें पक्कं लक्षांत ठेवा!

**प० खाटीक**—इतनासा छोटा चुव्वे मुआफक होके कितनी जवामर्दीकी और मगरुरीकी बाते बनाता है!

**दु० खाटीक**—उस्के खून चढेले आखों तो देखो!

**शिवाजी**—हत्तीचं गंडस्थल फोडणाऱ्याचे डोळे असेच असतात.

**ति० खाटीक**—अबे मू बंद कर. क्या शेरेबबरकी खाली बाते कर रहा है! किस्को शेखी बताता है?

**शिवाजी**—काय शेखी?

**ति० खाटीक**–तुमको नहीं बोलता! हमकु क्या करनेका है?

**च० खाटीक**–हुजूरके तख्तके साम्ने अमीके अमी खडा करनेके वास्ते अमीन साहेबकेपास उस्को ले चलो!

**शिवाजी**–अरे कुठलेरे तुझे हुजूर आणि अमीनसाहेब? हा बच्चा ईश्वराच्या हुकुमाशिवाय दुसऱ्या कोणाच्या हुकुमाला आणि कायद्याला मान देणार नाहीं समजलं! तुमचा बादशहा आमचा कोण? त्याला लवून मुजरा करणारे आम्हीं जिंकलेले शिपाई नसून, जात्याच स्वधर्मसंरक्षक शिपायी आहोंत. आम्हीं बादशाहाला खडी ताजीम देणारे नसून, बादशाहाकडून घेणारे आहोंत. चला सोडा मला!

( धिंगामस्ती होते. इतक्यांत शहाजी तरवार उपसून येतो. )

**शहाजी**–अरे कायरे काय दंगा आहे? सोडा त्याला! असल्या पादशाही रस्त्यावर, ह्या शहाजीच्या मुलाशीं, तुम्हीं मारामारी करता याची तुम्हांला शरम नाहीं वाटत! बादशाही कायद्यानं एका घटकेच्या आंत तुम्हां सर्वांनां कोलदांडे घालून फरमास तंबी देण्याची माझ्या अंगांत ताकत आहे हें तुम्हीं विसरलां होय? ह्या बादशाही अमलाच्या आधारस्तंभ शहाजी राजाला तुम्हीं ओळखायला पाहिजे होतं! ज्याला घाणही नाहीं आणि वासही नाहीं असा भयोत्पादक रणभूमीची आठवण करणारा शंकासुराचा मोहोर नाहींसा करून टाकायला माझ्या सारख्याला वेळ किती लागणार?

**प० खाटीक**–साहेब, यह अपके फर्जंदनें, हमारे एक जवान खाटिकको बिना गुन्हाह् चाक किया!

**शहाजी**–हें बोलायला शरम नाहीं वाटत! ह्याचं वय काय! तुम्हीं केवढे! हा एकटा! तुम्हीं किती तरी!

**दु० खाटीक**–अकेला अच्छी देखके उनोने काट डाला.

शहाजी–असं कसं होईल ?

ति॰ खाटीक–होगया तो सच !

शहाजी–तो केवढा होता ?

च॰ खाटीक–पचीस बरसका जवान था !

शहाजी–तो इतका मोठा असतां, ह्यानं त्याला मारला ! अगदीं झूट !

च॰ खाटीक–खुदा कसम सच है ! क्या सच है सो उन्कोही पूछलेना !

शहाजी–काय आहेरे खरी हकीकत ?

शिवाजी–खून केला ही गोष्ट खरी असून, तो न्यायानं केला आहे, हेंही खरं आहे.

शहाजी–काय न्यायानं ? तो कसा काय ?

शिवाजी–खऱ्या मराठ्याला गोवध कधीं बघवणार नाहीं.

शहाजी–खरं आहे !

शिवाजी–तर मग इथेंच न्याय झाला.

शहाजी–हा न्याय मराठी राज्यांतला आहे ! मुसलमानी रियासतींत हा मोठा अपराध गणला जातो.

शिवाजी–आपण माझे जन्मदाते आहांत ! वाटेल तें बोललां तरी चालेल; पण मी मात्र आपल्याप्रमाणें बोलणार नाहीं. हीं हाडं मुसलमानी अन्नानं पोसलीं आहेत असंही जरी आपण बोललां तरी चालेल. मी मात्र तसं म्हणणार नाहीं. बागें-तल्या झाडांना माळी पाणी घालून, त्यांची तोच सुश्रूषा ठेवतो; परंतु तें पाणी कोणाचं असतं ? जंगलांतलीं स्वेच्छेनं वाढ-लेलीं झाडं–उपवनांतल्या झाडांप्रमाणें जरी दिसत नाहींत, तरी सृष्टीउत्पन्नकरता परमेश्वर–त्यांचं पोषणकरता असल्यामुळें, कृत्रिमापेक्षां त्या नैसर्गिक रचनेचीच जास्त शोभा दिसते.

तेव्हां ह्या हाडांच्या पोषणासंबंधानं हाच न्याय इथें लागू पडत नाहीं काय? आपल्या म्हणण्याप्रमाणं जरी धरून चाललं तरी ह्य देह अशा तऱ्हेनं ह्या जगांत दृष्टीस पडण्यास मुसलमानांची कर्तबगारी खास उपयोगी पडली नाहीं.

**शहाजी**–कां फारसं बोलतो आहेस! तुझी इथून पुण्याकडेच रवानगी करून देतों, म्हणजे साराच बाजार आटपला. नाहीं तर, एखाद्या दिवशीं माझ्याच प्राणावर बेतायची. आतां ह्या बाबतींत गम खातां उपयोगी नाहीं. ( चौघां खाटकांस ) जा तुम्हीं! घडलेल्या गोष्टीबद्दल पूर्ण चवकशी होऊन तुम्हांला योग्य न्याय मिळेल! अगदीं काळजी करूं नका! बेफिकीर असा. ( शहाजी शिवाजीसह जातो. )

**प० खाटीक**–देखो अदनासा छोरा, लेकिन जैसी बिजली! क्यौं रे फरगोलबक्ष, उस पौरका गौर करना चाहिये नहीं?

**दु० खाटीक**–हां-हां-बेषक-अंगरखां-बेषक! वोह बडा जवामर्द लडका है! अपनी समशेर एकदम म्यानमेसें खेंचके बिल्लीनें शेरको नामोहरम करना–यह् लैले मज्नूके थोडेही बाते है?

**ति० खाटीक**–कोन कहेगा! लेकिन् यह बात अजायब तौरकी है, के उस छोकरेका पिदर राजा शहाजी, आपके पादशाही तख्तको, रोज दश हजारबार बंदगी बजानेवाला, उसका लडका, यह बादशाहीको करडे नजरसे देखनेवाला पैदा हुवा, इस्का क्या सबब! ऐसा कैसा हुवा! अल्लाह् हुताला कैसी पैदाषत करता है देखो! गरीब बिल्ली जानवरकेपास जैसे शेरके नखों! या अल्ला खुदाहे कुदरत्!

**च० खाटीक**–चलो अब वोह लडकेनें, आज जो कुछ धूम मचाई है, उस्का बदला लेनेके वास्ते खुदबखुद, फौरन गरीबन् नवाज हुजूरके कदमकेपास अरज करनेको सब मिलके जाएंगे.

**चौघे पाळी पाळीनें**–१ बेफ्रख चलो. २ क्या साले आद-नासे छोकरेकी जवामर्दी. ३ नूर जैसा सूरज इस दुनियाके पडदेपर. ४ उस्को देखतेही मै पहिले घबरा गया. १ अरे मै तो भागने लगा. २ वाहव्वा, मै तो पहिले उस्को पकड लिया! ३ और उस्के बावाने तुमारे ताबेमेसे छुडा लिया. ४ चलो जाएंगे साहिबा गरिबन्नवाजके रूबरू. ( जातात. )

( शहाजी, जिजाबाई व शिवाजी महालांत आहेत अशा प्रवेशाचा पडदा उघडतो. )

**शहाजी**–लहान आहे जाऊं दे! असं म्हणतां म्हणतां याचे चार फारच वाढायला लागले. आतां जर ह्या बाबतींत गम खाल्ली तर माझ्या सर्वस्वावर एखाद्या दिवशीं येऊन बेतेल. पुणें परगण्याच्या माझ्या जहागिरीची व्यवस्था बघणारे, दादोजी कोंडदेव, हिशेब देण्याकरतां आयतेच इथें आले आहेत. त्यांच्या बरोबर पुण्याकडे तुमच्यासह ह्याला धाडावं असं माझ्या मनानं ठरवलं आहे.

**जिजाबाई**–मला बाई, मोठं नवल वाटतं! भुंग्यानं कम-ळाला पीडा करण्याच्या ऐवजीं, कमळानं भुंग्याला केली हें ऐकणं, म्हणजे घोड्याला गाडी ओढूं लागली असंच नव्हे का? ह्या माझ्या बाळानं त्या खाटकाला ठार मारला असं म्हणायचं यांतलं गुपित मला कांहींच कळत नाहीं. माझा बाळ जळांत राहून माशांशी वैर करूं लागला हें खरं का?

**शिवाजी**–आई, काय सांगूं तुला! आमच्या ह्या आर्यभू-कमलांतला मकरंद चोरणारे हे दुष्ट-घातकी-यवन-भुंगे दृष्टीस पडले कीं, ह्या देहाची आग-आग होते. गोवधासारखी यांचीं अनन्वित कृत्यं लक्षांत आलीं म्हणजे, ते जशा आमच्या गोमातांच्या नरड्या फोडतात–तद्वतच, ह्या दांतांनीं त्यांच्या

कडाकड फोडाव्याशा वाटतात आणि आमच्या देवतांच्या भग्न केलेल्या मूर्ति व जमीनदोस्त केलेलीं देवळं पाहिलीं, म्हणजे त्यांच्या मशीदी, दर्गे–पाडून त्याच दगडांनीं, आपलीं देवळं उभारण्याचे प्रयत्न करण्याविषयीं हे हात–पाय स्फुरण पावूं लागतात. पण उपाय काय! ज्याचा धर्म त्याला प्यारा असून दुसऱ्याच्या धर्माचा उच्छेद करणं हें आर्यवीराचं काम नसल्यामुळें, त्या बाबतींत स्वस्थ राहण्याशिवाय इलाज नाहीं. माझी कोणतीच कृति बाबानां पसंत नाहीं त्याला काय करणार?

**शहाजी**–माझ्या मताप्रमाणें वागलास तर तुझी कृति मला पसंत पडलीच पाहिजे.

**शिवाजी**–आपण कोणच्या मार्गानं मला वागायला सांगणार?

**शहाजी**–परवां दरबारांत तख्ताला मुजरा केला नाहींस! त्यामुळें हुजूरचा जरा घुस्सा झाला आहे. तेवढ्याकरितां दरबार-वहिवाटीला अनुसरून तुला मुजरा केलाच पाहिजे.

**शिवाजी**–हें कृत्य, आपल्या घरांत येऊन चोरी करणाऱ्या चोराला प्रोत्साहन दिल्याप्रमाणें होणार असल्यामुळें अन्यायाचं आहे असं मी समजतों.

**शहाजी**–ऐका आतां तुम्हींच हें ह्याचं भाषण.

**जिजाबाई**–बाळ असं बोलूं नये.

**शिवाजी**–कां बरं?

**जिजाबाई**–आपण विजापूरच्या तक्ताचं अन्न खातों म्हणून.

**शिवाजी**- असं कोण म्हणतो?

**शहाजी**–( रागानें ) मी-मी-म्हणतों!

**शिवाजी**–तें कसं?

**शहाजी**–( हात जोडून ) हें-हें असं!

शिवाजी–हा मार्ग बरा नव्हे.

शहाजी–म्हणूनच हा मार्ग सोडून तूं पुण्याकडे जा!

शिवाजी–आपणही हा मार्ग सोडून तिकडे चलावं!

शहाजी–मूर्ख आहेस!

शिवाजी–हें मात्र खोटं! याचा प्रत्यय येईल.

जिजाबाई–तो रे कसा? आईबापांच्या मरजीबाहेर वागणारा मुलगा मूर्ख नव्हे का?

शिवाजी–नैसर्गिक राजमार्गावर निवडुंगाचं रान माजूं देऊन, कृत्रिम मार्गाचं अवलंबन करण्यास उपदेश करणारे आईबाप, स्वच्छ सूर्याच्या झक्क प्रकाशाला तुच्छ मानून, दिवटीच्या प्रकाशाला सूर्याची किंमत देणारे नव्हेत काय?

शहाजी–पालखींत बसून घरीं येत असतां, मध्येंच उडी मारून त्या खाटकाचा प्राण घेतलास–हाचना तुझा नैसर्गिक राजमार्ग?

शिवाजी–ह्याला खोटा कोण म्हणेल?

जिजाबाई–कसारे तो खरा?

शिवाजी–आई, आमचं पूर्वींचं रजपूत कूळ केवढं! त्याचा नांवलौकिक केवढा होता! पण त्यापैकीं आतां कांहीं राह्यलं आहे का? तारुण्यांत जर हात पाय झाडून, आपलं गेलेलं मिळवण्याचा प्रयत्न करायचा नाहीं–तर काय म्हातारपणीं करायचा! भयाचं पांघरूण घेऊन, चोराला मलिदा खाऊं द्यायचा आणि आपल्या सध्यांच्या थुंकझेलीच्या वर्तनानं आपल्या पवित्र कुळाची होत असलेली विटंबना, आपल्यासारख्या सरदारांनीं आपल्याच हातांनीं जास्त करून घ्यायची! आपण जर असे वागलों तर गरीब लोकांनीं काय करावं? आपल्या देशमातेला ज्या जुलमी हातांनीं-ज्या दिवशीं-आपल्या गोशांत खेंचली त्या

दिवशीं, तिच्या पुत्रांच्या रक्तानं तिचं वस्त्र कोणच्या रंगाचं झालं असेल बरं ?

**शहाजी**—बाळ, तुझं म्हणणं खरं आहे! पण उपाय काय? सर्वतोप्रकारें हताश झालेल्या ह्या आर्यभूमीच्या स्वातंत्र्याची आतां आशा धरणं म्हणजे कांहीं अर्थ नाहीं. अशी जिथे गोष्ट आहे तिथे विनाकारण आपला जीव धोक्यांत घालून, शांततेंत मग्न असलेल्या घराला स्मशान बनवण्यांत अर्थ काय?

**शिवाजी**—आपल्या एकट्याच्या घरापेक्षां, आपल्या बंधूंच्या घरांची, आपल्याला प्रथम काळजी घेतली पाहिजे. स्वदेशा-करतां जरी आपले प्राण धोक्यांत पडले, तरी काय हरकत आहे? ईश्वरी न्यायाचे कायदे हेच आमच्या देशमातेचे हक्क आहेत. आम्हीं तिचे सुपुत्र आहोंत. तिच्या होत असलेल्या हालांतून तिला जर सोडवली नाहीं, तिचे लचके तोडणाऱ्या रक्तलोभी राक्षसांच्या सपाट्यांतून तिला मुक्त करण्याचे जर आम्हीं प्रयत्न केले नाहींत, तर आमच्यावर मातृहत्येचा दोष येणार आहे. ज्या गुलामगिरीच्या श्रृंखलेनं माझे देशबांधव बांधले गेले आहेत, ती श्रृंखला दिवसें दिवस जास्त जोरानं त्यांना आंवळीत असून, कांहीं दिवसांनीं तर ती मांसांतून आंत घुसून ह्या हाडांचा चुराडा उडविणार आहे. मी जर जातीनं आर्य आहे तर माझ्या आर्यभू करितां वाटेल तेव्हां हत्यार उचलायला मला अधिकार आहे. आणि त्याच अधिकारानं मी हें आजचं कृत्य केलं आहे.

**जिजाबाई**—शिवबा, तुला आज झालं आहे तरि काय? अली-कडे हें स्वदेशसेवेचं कुठलं खूळ तुझ्या पोटांत शिरूं लागलं आहे? स्वदेशसेवेला काय काय लागतं याची तुला कल्पना आहे का?

**शहाजी**—ह्याच्या मनांत हे विचार जागृत होण्यास मुख्य कारण तुम्हींच आहांत. ह्याच्या वेळचे तुमचे डोहाळे मला पक्के

आठवतात. रामायण–भारतांतल्या कथा ऐकण्याचा जो तुम्हांला त्या वेळीं नाद लागला होता, त्याचाच हा परिणाम–अभिमन्यु प्रमाणें ह्याच्यावर गर्भावस्थेपासून झाला आहे.

**जिजाबाई**–पण अभिमन्यूला चक्रव्यूहांतून परत येण्याचं माहीत नव्हतं.

**शिवाजी**–मला तें सगळं माहीत आहे.

**शहाजी**–ठीक आहे तर मग! तुम्ही मातोश्री आणि हे तुमचे चिरंजीव. संभाळा आतां. दादाजींच्याबरोबर निघण्याची उद-यीक तयारी करा. हे पहा दादाजीच इकडे येत आहेत. (दादोजी येतात. ) या दादाजी! तुम्हीं इथें आलांत तें काम कालच संपलं! आतां उदयीक निघण्याची तयारी करा. कारण ह्याला आतां इतउत्तर इथें ठेवण्याची सोय नाहीं. तेव्हां ह्याला ह्याच्या मातोश्रींच्यासह तुमच्या देखरेखेखालीं पुण्यास ठेवावा असा विचार केला आहे.

**दादोजी**–हुजूरचा विचार युक्तच आहे. असा विचार हुजूरनीं करावा असं मी सुचविणारच होतों. इतक्यांत आज्ञाच झाली.

**शहाजी**–कां बरं? असं तुम्हीं मला सुचविण्यास तुम्हांला कारण काय झालं?

**दादोजी**–सरकार, कारण पूर्वींच झालेलं आहे. आजचा खून किंवा परवांचा दरबारचा अपमान–ह्या सगळ्या गोष्टी, शिव-बांचा जन्म होण्याच्या आधींच ठरलेल्या आहेत. हे झाले तेव्हां शंभुमहादेवांनीं 'आपण स्वतः मानवरूपें आपल्या पत्नींच्या पोटीं अवतार धारण करणार असून, गोब्राह्मणप्रतिपालक आणि राज्याश्रममुनि बनणार आहोंत' असा प्रसन्न होऊन दृष्टांत देऊन 'बारा वर्षांनंतर यांस सन्निध ठेवूं नये' असंही त्यांनीं

सांगितलेलं आठवत असेलच. तेव्हां आतां काय? यांनां पंधरा वर्षं पुरी व्हायला आलीं. म्हणून दूर करावे तितके बरे.

**जिजाबाई**-शंभुमहादेवाच्या कृपेनं आणि तुळजापूरच्या अंबेच्या दयेनं आतां होणाऱ्या ताटातुटीचा शेवट गोड होवो म्हणजे झालं!

**दादोजी**-तो होणारच! त्यांत विशेष काळजी ती कसली! रात्रीचा नाश होण्याची वेळ जसजशी समीप येऊं लागते, तसतशी पूर्व दिशा लाल भडक होत जाते आणि रात्रीचा पुरता नाश झाल्यावर तो रक्तवर्ण पार नाहींसा होऊन, रात्रीच्या दुःखानं विलीन झालेल्या वस्तु सूर्योदयाच्या ऐश्वर्यानं प्रफुल्लित होतात. त्याचप्रमाणें यावनी तिमिराचा नाश आणि वैदिक धर्ममार्तंडाचा उदय यांची स्थिति होणार आहे.

**शहाजी**-या उभयतांना समागमें नेल्यावर पुढें व्यवस्था काय करायची त्याबद्दलचा सर्व बंदोबस्त जरी मी सांगणार आहें तरी तुम्हीं योग्यच आहांत. तेव्हां सुरळीत चालेलच. ( एक नोकर येतो. )

**नोकर**--सरकार,--साहेबीण सुलतान महंमद आदिलशहा खास गरिबन्नवाज--यांजकडून हा लखोटा घेऊन एक स्वार आला आहे.

**शहाजी**-(लखोटा फोडीत) बहुतेक चिरंजीवांच्या आजच्या सत्कृत्याबद्दलचं बोलावणं असेल हें! (वाचून) तेंच. ठीक आहे! यांत आतांच्या आतां मला बोलावलं आहे. तर मी तिकडे जातों. ( जातो. )

**जिजाबाई**-बाळ, पुराणीक बोवांची वेळ झाली! येतोसका?

**दादोजी**-चला बाळ!

**शिवाजी**-चला-आलोंच! (शिवाजी-शिवाय सर्व जातात.) रामायण आणि भारत ह्या पुराणांचं बारकाईनं श्रवण केल्यामुळें,

भरतखंडाची सांप्रतची स्थिति पाहून, स्वदेश आणि स्वधर्मवात्सल्याचं तीव्र वीष ह्या देहांत इतकं जोरानं पसरलं आहे कीं, त्याच्या उताणखाट वेगानं, ह्या शरीरांतल्या सर्व धमन्या आणि स्नायू जोर करूं लागून, गोब्राह्मणप्रतिपालनार्थ, ह्या देहावरच्या असंख्य द्वारांतून सूड-सूड-असा शब्द बाहेर पडत आहे. माझ्या स्वदेशबांधवांचा गाढ झोपेंत निमग्न झालेला उत्साह, पतन पावलेलं धैर्य, अस्तंगत झालेली जन्मभूमातेच्या सेवेची दक्षता आणि स्वातंत्र्यप्रियता, ह्या गोष्टी सर्व भरतभूमीभर एकदम उदय पावणं जरी शक्य नाहीं तरी, अमावास्येचा खून करून, सूर्यनारायण जसा आपल्या तेजानं हलके हलके चंद्राच्या कला वाढवतो त्याप्रमाणें तें होईल यांत संशय नाहीं. आतां पुण्यास गेल्यावर तेथले मावळे-गडकरी वगैरे मराठे लोक जमा करून सध्यांच्या स्थितीचं चरचरीत अंजन त्यांच्या डोळ्यांत घालायचं आणि त्यांच्याच साह्यानं, प्रथम किल्ले, गड, कोट स्वाधीन करून घेऊन साधु-संतांच्या सेवाशस्त्रानं धर्मसंस्थापना आणि राज्यसंस्थापना हीं दोन कामं उरकायचीं. वैभवाच्या उष्णतेच्या तापानं घर्मभारित झाल्याकारणानं अंगीं-उठणारी कंडु शमन करण्याकरितां, जे प्रमत्त यवनकरी आमच्या पुण्यलक्ष्मीवृक्षाशीं घर्षण करीत आहेत त्यांचे तुकडे-तुकडेच केले पाहिजेत. असलं हें कृत्य करायला श्रीरामचंद्राप्रमाणें मायापाश तोडून या देहाची संकटांना ढाल बनवली पाहिजे. सध्यां चहूंकडे जो षंढत्वाचा बाजार भरला आहे त्याला मर्दाईचं रूप देऊन, हा देह-स्वधर्म आणि स्वदेश ह्यांकरितां चंदनाप्रमाणें झिजवून-ब्राह्मणादि आर्यांना परकीय लांडग्यांच्या तडाक्यांतून सोडवण्यांत खर्ची घातला तरच नांवाचा शिवाजी खरा ठरेन! ( जातो. )

---




## प्रवेश तिसरा.

( बेषखखान रस्त्यावर येतो ).

बेषक–वाह्व्वा! लाहोलबिला! इतने दीन यह गुलाबके फूलका इस मुआफक अजमोदा लेनेका वख्त मुजको कभी न मिलगया! ओ-हो-क्या इस्की तौर है! जैसी अस्मानकी नाजनी परी! बिलकुल अस्मानसे खुदबखुद यह जवानके वास्ते अल्लानें भेज दिया है! ऐसा होके, वोह उस्का मर्द कहेनेवाला निळो-सोनदेव, इस्के उपर अभी मालकी-हक् कहता है! यह कोत-वाल साहाबके साथ यह मामला है! ठीक-है-अच्छा-है-खूब ध्यानमे रखो! अभी यह रंगेली, रसेली, छबेली, सूरत प्यारी, दिल रमाई छोड हमारी, कैसी करेगी गमख्वारी, यह मुजे देखना है भारी! साथ अभी यह लायी है जो शराफ वोह् खूप पीकर, फेर उस लौंडी चंद्राका मुकाब्ला बेषख बडे मेहेर नजरसे मोहबतके लिये ले–लेइंगे! ( दारू पितो. ) ओ-हो, इस दुनियाके पडदेपर मोहबत करनेवाले अभी तो बहोत है! लेकिन यह शराफ पीकर जो कुछ मजा करता है वोह बेषख अफ्लागमेका शुक्रे मौलाके तख्तके नज्दीकका मजा पाता है! अच्छा! अभी यह साथ लायेला गोष्त यह परीके वोह् बरतनमे रख देना! वोह देखतेही, उस्के रिश्तेदार उस्को कैसे मकानके भीतर आने देंगे वोह् देख लेंइंगे! वोह मेरी प्यारी अभी मैले कप्डे सफा करनेमें मष्गूल हो गयी है! यह वख्त बहोत अच्छा है! ( चंद्राच्या धुण्याच्या पातेल्यांत मांस ठेवतो. ) अहाहा, क्या इस परीके बदनकी खबसूरती है? मनमें आता है के ऐसेही जाके उस्को एकदम दस्तमें गिरफदार करलेऊं ( पाहून ) अँ ये कौन छोरा इधर आता है? ( बाजूला होतो इतक्यांत एक गुराख्याचें पोर येतें. )

**सठव्या**–ह-ह-ह-ह-ह-ह-ह-हर्णि-हर्णि-हर्णि-का कराव इचिभन इक्ता पाठी लागलोया तरीबी ही गाय गवसात न्हाय! (पाहून) अर ह्या तर आमच्या बाईसाब चंद्राबाई! धुनी धुत्याती! अँ-अन् ती हर्नीबी त्येंच्यापाशीं सवास्त नदीमंदी पानी पीत उभी है. अँ-अन् हार कोन दाढी मिय्या हत लपून उभा है? अन् हा तर ह्या गांवचा कोतवाल! हा हत कशापाई आला है! ह्येनं तर आमच्या गावामंदी कहार मांडलाया! तरनी–छबाकडी आवा पगितली किं लागलाच तिच्या पाठी! नग बाबा ह्ये मुसलमानी राज! आमच्या चंद्राबाईसाबापं तर ह्येची नजार नसलना? नुसता दाढी बोकुड है–दाढी बोकुड! आतां असं न्हाय! बाईसाबाप जाऊनशान त्येना घरी घ्येऊन जावं म्हजी समदाच आंद्येसा ग्येला. (चंद्रा धुवीत आहे व तिच्याजवळ नदींत गाय पाणी पीत आहे-तेथें जाऊन) बाईसाब, इक्त्या उन्हामंदी आपुन नदीवर यकट्या कशापायी धुवाया आलांत?

**चंद्रा**–अरे झालं धुणं! अरे पण ही हर्णी इथे कशी आली? अन् ही अशी भीतीनं कांपते आहे कां?

**सठव्या**–काय सांगू बाईसाब, त्यो पगा दाढीवाला–त्येला पगूनशान ही जी उधाळली म्हनता ती आपल्यापाशीं येऊनशान सवास्त उभी राह्यली हाये!

**चंद्रा**–कोणरे तो मेला?

**सठव्या**–ह्या गांवचा कोतवाल नव्हका?

**चंद्रा**–मग तो आतां इथे कशाला आला आहे?

**सठव्या**–आला असल मासं बिस माराया! आपलं धुनं झालं असलं तर चला वरी?

**बेषख**–अभी आगे बढनेका यह मौका ठीकहै! (पुढे होऊन) अबे ए लौंडे, तूं क्या इस परीका लौंडा है? मै इदर

कुच्छ मच्छी पकडनेको नही आया! आया समजके बीचमे? यह छबेली सूरतपर मै जैसा आषख हुवा है उस मुजब् मेरे चांदसे हुस्नपर वोह चंद्रा आषख होगई है! हमारी बीबीसाब बननेका इस्का इरादा है? आज कय्येक दीन यह दो आषख माषुखकी आपसमें मोहब्बत चली है? यह तुमको क्या मालुम! ( पिशवी काढून ) यह ले तुमको इनाम! देखो, वोह बात किसीकेपास बोलना नहीं—समजा?

**सठ्या**—अर वार—वा! का म्हनतोसरं इचिभन? आमच्या बाईसाब—अन्—तू—(तिच्याकडे व त्याच्याकडे घाईघाईनें टकमक बघतो ).

**चंद्रा**—परमेश्वरा, काय हा माझ्यावर घोर प्रसंग आणलास? चंद्राचं ग्रहण सुटल्यानंतर ज्या आनंदी आणि आतुरतेच्या नजरेनं सर्व दुनिया चंद्राकडे बघते त्या प्रमाणें, मी ज्यांनां माझी दुनिया समजते, त्या माझ्या पतीनां असली ही खोटी फसवेगिरीची बातमी कळल्यावर त्यांचे नेहमींचे माझ्या भेटीसाठीं आतुर असलेले ते डोळे—माझ्याकडे कोणत्या बरं आतुरतेनं बघतील? भयंकर तिरस्काराच्याच ना? गोमाते, मी जर खरी पतिव्रता असेन, तर माझ्यावर येणाऱ्या ह्या खोट्या कलंकांतून मला वांचीव!

**बेषख**—अरे छोरा, देखता है क्या तूं ऐसा? यह तेरी मालकन् तुजको देखतेहि घबरा गया है! देख अभि वोह बात उस्के मर्दको समजेगी और उस्को वोह अपने मकानसे हकाल देगा! इस् वास्ते उस्को डर मालुम होती है! लेकिन कुछ परवा नहीं! मेरे बुलबुल चंदेमेहेताब, तूं कायको इत्नी डर पाती है! तेरा मर्द तुजको मकानसे हकाल देंगा, तो मै खुद अपने सिरपर तुजको लेकर गोशेमे ऐसी रख देउंगा, के तुमारा एक उंगलभी किसीके नजर न आवे! चल साथ मेरे!

चंद्रा–( संतापून ) हे अदृश्य देवतानों, हे माझ्यापुढें सरसावलेले ह्या नरपशूचे हात–तुम्हीं तोडून कां बरं टाकीत नाहीं? आपल्या गोड दुधानं तुम्हांला रोज संतुष्ट करणाऱ्या ह्या गोमातेकरतां तरी तुम्हीं माझं रक्षण करा! अरे मेल्या धटिंगणा, माझ्यासारख्या गरीब साध्वीला कां छळीत आहेस?

बेषख–देख लौंडी, अभी ऐसा ढोंग मचाना बेफायदा है! अब्रूकी बाते क्या है? मै इतना बडा पातशहाका अफ्सर, मेरे गोशेमे क्या कम है? चलो मेरे साथ! यह छोरेकोभि ले चलो! उस्की सुंता करके उस्को मुसलमीन लौंडा–और तुमको यह बेषखखांके बीबीसाब बेषख बना देगा! इस्मे क्या है!

सठ्‌व्या–काव्ह कोतवालसाब, अपुन म्हंग्ता की, ह्या आमच्या बाईसाब, तुम्हांवर फिदा हैती! अन् मी हत है म्हून तुमास्नी ह्या भित्यात! ह्ये का तुमी गावचं अमलदार म्हून खरं म्हनायचं व्हय? ठीक है यो जबरदस्ताचा न्याव! ही पल्याडली गाय बी आपलीच म्हना?

बेषख–अबे लौंडे जबान तो बडी खूली करदिया है तूने बेषख!

सठ्‌व्या–आपलं नांव बेषखखां है म्हून!

बेषख–बस्स एकदम जबान कब्ज करले! नहीं तो देख! मै जो कुछ बात किया है वो झूट है?

सठ्‌व्या–तसं नव्हं कोतवालसाब! सरकारी नोकर कंदीबी झूट बोलत न्हैत. अन् त्येतल्या त्यांत शिपाई तर कंदीबी खोटं काम करीत न्हाईत. अन अपन तर काय–शिपायांचं राज! अपुन कसं ख्वाटं बोलाल?

बेषक–अरे साले यह देखले–तूं तो इस जगेपे अभी आया! इत्ने देर, खाना, पीना, लेटना, कितनें मजेका हुवा!

तुमको क्या मालूमहै ? तुमको देखतेही, वोह् हमारे प्यारीनें खानाबिना सब छुपाया है! वोह् उस्का धूनेका बरतन तो देखो पहिले.

**सठव्या**–( पाहून ) ह्येच्यांत काईवी डाव दिसतोया ! आतां काय युगात करावी ?

**चंद्रा**–काय, माझ्या धुणी धुऊन ठेवलेल्या पातेल्यांत मांस आहे ? आतां मात्र माझं नशीब फुटलं खरं ! हे गोमाते, हा देह तूं तरी आपल्या पवित्र लत्ताप्रहारांनीं तुडवून छिन्नविछिन्न करून टाक ! नाहींतर ह्या देहाचे जे आतां धिंडवडे होतील ते ह्या डोळ्यांनीं मी बघत असतां ते फुटून बाहेर येतील. परमेश्वरा, हें असलं कुभांड तूं माझ्यावर कां बरं रचलं आहेस ?

**सठव्या**–आपल्या पतिवर्तापनाची परक्षा पगन्या करता !

**चंद्रा**–अरे सठव्या, हा माझ्यावर निव्वळ आळ आला आहेरे !

**सठव्या**–गन्येस चौथीचा चंदर तर अपुन पगितला न्हाईना ?

**चंद्रा**–होयरे ! गेल्या गणेशचतुर्थीचा चंद्र मी बघितला होता खरा !

**सठव्या**–बाईसाब, त्येचंच ह्ये फळ है ! डुकरासारखा हलका परानीबी त्येदिशी आपलं त्वांड जमीनींत घुसवून गुमान उभा -हातो !

**चंद्रा**–अन मग शिकारी त्याची शिकार करतो !

**सठव्या**–तशीच ह्यानं आपली आतां चालवली हाये. ( स्वगत ) पन आपलं इंगित राखन्यापायीं ही आवा असं म्हंगत नसल कशावरून ! हं:–हीं पल्डी आवाची जात ! कव्हांच गुंगारा मारून काय करून यइल त्येचा काय न्येम है ! ( उघड ) पन बाईसाब, ह्या गोष्टीचा निकाल कसा व्हनार !

हा तर आतां तुम्हाला सोडीत न्हाय ? तव्हां ही ग्वाष्ट धन्याप नेल्याबिगार कशी तुटनार ?

**चंद्रा**—झालं आतां मात्र सगळंच आटपलं ! सासूबाई म्हणजे प्रत्यक्ष कडक जगन्माता ! त्यांनां हें कसं सहन होणार ?

**सठव्या**—बाईसाब, मी घराप जाऊनशान ह्ये सम्दं धन्यास्नी समजावतो, अन् त्येना हक्ड घेऊनशान येऊन न्याव करूं म्हजी झालं !

**चंद्रा**—देवा, मी जर कोणच्चंच पातक केलं नाहीं तर मी एवढी भीति तरी कां धरावी ? अनाथांचा वाली परमेश्वर असतो असं म्हणतात ; तर त्याच्यावरच्च सगळा भार टाकावा म्हणजे झालं ! मी जर खरी पतिव्रता असेन तर माझी लाज ही गोमाताच रक्षण करील.

**सठव्या**—( स्वगत ) आतां आपून हतून गेल्यावर ह्येनं जर काई वाकुंड क्येलं तर ! न्हाय-पन-हां-अशी युगत करून जावं ! ( उघड ) अव कोतवालसाब, ह्ये पगा, येवींत्येवीं आपुन ह्येंच्या संग सम्दी मोहबत क्येली म्हनता-अं-असंच का न्हाय ?

**बेषक**—बेषक—इस्मे क्याहै षख !

**सठव्या**—तर मग आतां असं करा ! ह्ये पगा, ह्या आवाच्या मर्दाला हतं मी घ्येऊनशान येतो. त्येनं ह्यो परकार पगितला कीं त्यो हिला द्येईल सोडूनशान ! अन मंग काय राव ! करा चैन ! घुसवा गुमान गोशांत.

**बेषख**—बहोत अच्छा, बहोत खूब ! क्या उसका मगज काम कररहा है भेंचोद !

**सठव्या**—पन वचन द्या ! हे पहा, आतां ह्या आवाला तिच्या मर्दादेखत तुम्हीं आपली बीबीजान केलीत, म्हजी त्येंत तुमचं नांव जे बेषखखां है त्ये बरोबर शोभल.

**बेषख**–हं-हं-बेषख! वोह मर्दोंका काम है.

**सठ्या**–मी ह्या आवाच्या धन्याला हत आनीपर्यंत ह्या आवाला काईबी धका लावनार न्हाय अस वचन द्या तर मग?

**बेषख**–यह लेव बचन! (वचन देतो व सठ्या जातो. त्याला गेलासा पाहून) कसम और बचन यह दोनो हमारे बापजादेने ज्यो कभी सच किया नहीं तो हम काह्यको करना? बस इस्को एकदम पकडके मुर्गामुर्गीका झगडा करना, यहीबात, इसवख्त अच्छी है! (पुढें होऊन) अय मेरे दिलजान् नाजनी परी, मेरा दिल तेरे बदनके खुबसूरतीसे कितने दीन गिरफ्दार किया गया है! तेरे सरीखी गुलाबकी कली बैठनेवाला हारा रंगका प्याला मै बनने चाहता है! यह प्यालेमें जो तुमारे सरीखी गुलकी कली बैठजाएगी तो यह बेषखखां प्यालेको गुलचमन अजमानेका मौका बेषख आएगा! चल मेरी प्यारी! तुजे देऊंगा मै देहेलीकी गुलेनार सारी, लेकिन मतकर गमख्वारी!

**चंद्रा**–अय बेवफा, पाक–परवरादिगारको नापाक बनानेवाला बंदर, मुजको क्याहै तेरी कदर, जाव मेहेलपर, और उठाव रंडीकी चद्दर–तेरी मा है मेरी मादर!

**बेषख**–अल्ला–अल्ला–मै क्याहै तेरा बिरादर?

**चंद्रा**–मू बंदकर–फत्तर–बिलंदर.

**बेषख**–क्या, तुजे नहीं मेरी कदर?

**चंद्रा**–उस्के वास्ते चले जाव उधर!

**बेषख**–मै जाऊं किधर?

**चंद्रा**–दोजखके खाईपर!

**बेषख**–नहीं, मेरा ठिकाना है इस पांवपर! (पायां पडतो. सठ्या आणि निळो सोनदेव व इतर नागरिक येतात.)

निळो०–हर, हर! मी हें काय बघतों आहें! तो मुसलमान तिच्यापुढें आणि ती त्याच्या पुढें! तो दीन झाला आहे आणि ती क्रोधाविष्ट दिसते आहे. ही ज्यावेळीं चिडून रागावे त्यावेळीं जशी सुरेख दिसे, तशी ह्या सध्यांच्या रागांत दिसत नाहीं. तेव्हां ह्याचा अर्थ कांहीं तरी निराळा असेल यांत संशय नाहीं. ( पुढें होऊन ) क्यौंबे, ए अल्लाके दोस्त, ए–तूं क्या कर रहा है? अम्रे अंमाके पांव पकडता है?

बेषख–आईये–आईये–साहेब–आईये! यह–हमारी बीबी-जान–तुमारी अंमाजान अभी बनगयी है! समजा? बीबी-जानके पांव पकडना, उसको शेरा चढाना, अबीर लगाना, लोबान बताना और फेर उस्के साथ-बोसा लेकर मोहब्बत करना, यह तुमारे सरीखे फत्तरकी पूजा करनेवालेको क्या मालुम?

निळो०–परमेश्वरा, माझ्या डोळ्यांचं पारणं फिटलं! रांडेनं, सूर्यनारायण आणि गोमाता यांनां साक्ष ठेवून बदकर्म केलंन त्या पेक्षां-अंधेरांत बसून एकीकडे हवं तें केलं असतंन, तरी कांहीं हरकत नव्हती. पण रांड प्रत्यक्ष हजामाचा आरसा बनली! वाटेल त्यानं आतां त्यांत आपलं तोंड पहावं! परमेश्वरा, केवढी ही माझी दीन स्थिति केलीस? ह्या आत्म्याला आतां ह्या देहाचं मांदिर नकोसं वाटतं! माझ्या आत्म्याला जर ह्याचवेळीं ह्या देहाच्या ऐवजीं दुसरा देह मिळेल तर त्याच कवचाच्या जोरावर, आर्यस्त्रियांवर डोळा ठेवणाऱ्या आणि त्यांना भ्रष्टकरण्याचा प्रयत्न करणाऱ्या ह्या यवनांचे तुकडे तुकडे उडवण्यास मी तयार होईन? पण आतां ही कष्टतर स्थिति बघवत नाहीं. हिचा गळा दाबून हिला अशीच ठार मारूं का? (चंद्राचा गळा दाबतो व गाय धाडकन पडते.) अरे पण ही गाय कांबरं पडली? ही स्त्री शुद्ध असल्यामुळें, माझ्या हातून घडत असलेलं दुष्टकर्म ह्या गाईच्यानं बघवलं नाहीं म्हणून तर ही पडली नसेल ना?

**बेषख**–अबे ए हरामखोर, किस्के औरतका गला दबाता है? क्या हमारे औरतका खून करता है ?

**निळो०**–काय, ही स्त्री ह्याची असून मी परस्त्रीस्पर्शानं अधमाधम ठरलों ? पण ह्याचा अर्थ काय ? मी बघतों आहें ही चंद्रा नव्हे काय ?

**चंद्रा**–आजपर्यंत जरी अशा स्थितींत मला प्रिया म्हणण्याचा कधीं प्रसंग आला नाहीं, तरी ही वेळ पहिलीच अशी असल्या-मुळें ह्याही वेळीं मी प्रिया म्हणतें–ऐकायचं थोडं ? मी अद्याप पतिव्रता आहें किंवा नाहीं ह्याबद्दल-वर सूर्यनारायण आणि खालीं ही गोमाता साक्ष आहेत. माझ्या अंगच्या पवित्रतेची साक्ष पटवण्यासाठींच परमेश्वरानं ह्या दाढीवाल्याला ही बुद्धी दिली आहे असं वाटतं ! तेव्हां खरं काय आहे तें–प्रत्यक्ष माझ्याकडून दिव्य करून घ्यावं म्हणजे झालं.

**निळो०**–अग सठवे, प्रत्यक्ष मांस खायला संवकलेली तूं गिधाडीण, दिव्य कसलं करतेस ? आपल्या डोंबल्याचं होय ? कायरे सठव्या, तें मांसाचं पातेलं कुठें आहे ?

**सठव्या**–हें घ्या सरकार ?

**निळो०**–कोंब तें ह्या रांडेच्या तोंडांत. (पाहून) अरे पण हा काय चमत्कार. ज्यांत मी मांस बघितलं त्यांतच त्याच्या ऐवजीं ह्या फुलांच्या माळा कुठल्या आल्या ?

**बेषख**–तुमनेही रखा होगा !

**निळो०**–अरे जा बदमाष !

**चंद्रा**–( एक माळ नवऱ्याच्या गळ्यांत घालून ) आतां अंत किती बघायचा ? ती दुसरी माळ आपल्या हातानं पुन्हां एकवार माझ्या गळ्यांत घालून खरी पतिव्रता म्हणा म्हणजे झालं!

**निळो०**–अग आतां मी कशाला म्हणायला पाहिजे ! हा

सूर्यनारायणच आपल्या तेजाप्रमाणें तुझं पातिव्रत्य अढळ आहे असं सर्वांनां सांगेल. ( माळ घालतो. )

**बेषख**–क्या अजायब चीज है? गोष्तका गुल और गूलोंके दो गलेहार–मेरे रूबरू बनगये! इल्नाही नही तो मेरेकु यह् चंद्रा मेरी मादर और यह निलोपंत मेरा पिदर, नझर आने लगा है! हिंदुओंके पाक औरतोंकी क्या अजायब तौर है? जिस देसमे ऐसी औरतां पैदा होनेलगी है उस देसपर हमारे सरीखे दूसरे देसके राजाका अमल अभी बहोत दीन टीकना मुष्किल है! यह औरतों अपने खाली नजरसे जैसा गोष्तका-फूल बनानेमें अखत्यार रख्ते है–उसमुआफक, मुसलमीनोंका तख्त बरबात करनेवाले लडकेभि वोह् पैदा करेंगे! आय खुदा, आय नबी, मै तेरा अलबत गुन्हेगार हूं! मै जो उस अजायब औरतकी दस हजार बार बंदगी उठालेउं तो मुजको मेरा गुन्हा तुम जरूर माफ करेगा! ( पायां पडतो. )

**चंद्रा**–अरे बाबा, तूं आमच्या पायां कां पडतोस? अशी मला छळण्याची जर तुला वास्ना झाली नसती तर माझी किंमत ही जगाला कळली नसती! परमेश्वरानं तुला ती सुबुद्धि दिली होती. म्हणून उठ! परमेश्वराला शरण जा!

**बेषख**–अय खुदा–मन्नगोयं, केह् खतातं बपिजीर, कलभे अफू बर्गुनाहं करा.

**निळो०**–आज माझ्या स्त्रीनं, पातिव्रत्यखड्ग धारेकडून जो अमर जय प्राप्त करून घेतला, त्याच्याच तेजानं मी जरी अगदीं दिपून गेलों आहें, तरी इतउत्तर, ह्या दांडग्या, अड-दांड आणि नीच यवनानां ह्या भूमीतूंन पिटाळून लावण्यास ह्याच माझ्या दिव्य शक्तीचा मी उपयोग करून, स्वदेश-मातेच्या ऋणांतून मुक्त होईन तरच निळो सोनदेव हें नांव कायम ठेवीन. ( पडदा पडतो. )

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

( पैठणच्या रस्त्यावर **दपटशास्त्री तुरतुरे** आणि **तिरपिड घे चक्रशास्त्री** येतात. )

**दपट**–कायहो, काल गंगेवर फारशा चक्रा मारीत होतां ?

**तिरपिड**–गंगेवर यात्रेकरूंना आपल्या नांवाप्रमाणेंच संकल्प सांगत होतां कीं काय हें पहात होतों.

**दपट**–मग कसं काय पाह्यलंत ?

**तिरपिड**–अगदीं हुबेहुब–दपटशास्त्री तुरतुरे–ह्या नांवाला साजेलसंच चालवलं होतंत.

**दपट**–तें कसंकाय ? उगीच कांहीं तरी बोलतां झालं !

**तिरपिड**–ज्या दोघीं सकेशा विधवांनां तुम्हीं संकल्प सांगत होतां, त्यांना ह्या अशा पवित्र क्षेत्रीं केशवपनाशिवाय संकल्प सांगितलात ह्यांत दपटशास्त्रीपणा नाहींका केलात ? तें कर्म आणि तो संकल्प शास्त्रोक्त झाला का ?

**दपट**–तरी म्हटलं आमचे हे तिरपिड घे चक्रशास्त्री पिंडावरच्या कावळ्यासारखे चक्रा कां मारीत होते ! अहो, त्या दोघी स्त्रियांनां केशवपन करायला मी सांगितलं नाहीं असं का तुमचं मत आहे ?

**तिरपिड**–अलबत ! विधवांचं केशवपन केल्याशिवाय, तीर्थयात्रा करण्याला त्या पवित्रच ठरत नाहींत !

**दपट**–बहुतकरून धर्मसिंधूतला आधार असेल हा ?

**तिरपिड**–यांत काय संशय ! हा कोठला आधार असावा हें सुद्धां तुम्हांला माहीत नसावं ना ? केवढी शरमेची गोष्ट ही !

संकल्प कशाला सांगतां–बोडक्याला तर मग ! तुम्हीं आज हें धर्मबाह्य कृत्य केलंत–उद्यां बाय्यांना जातींत घ्यायला लागाल ! छे तें उपयोगी नाहीं. तुम्हांला ग्रामण्यांत काढले पाहिजेत.

**दपट**–हें सर्व भाषण धर्मसिंधूच्या ऐवजीं अनुकूल सिंधूतलं पाठ केलेलं दिसतं आहे. स्वराज्य, ह्याच तत्वज्ञानानं जाऊन द्वैताच्या फेऱ्यांत सांपडून मुसलमानांची गुलामगिरी करीत आहांत हें ढळढळीत दिसत असतां, अजून ऐक्यभावाला लाथा मारीत आहांत–म्हणूनच तिरपिड करीत चक्रा मारीत आहांत समजलं ! अहो, त्या स्त्रिया म्हणजे प्रत्यक्ष जगन्माता आहेत हें लक्षांत ठेवा ! मर्यादेच्या पलीकडे जाऊन पोंचलेल्या आहेत त्या स्त्रिया–समजलांत ?

**तिरपिड**–मग यांत काय शंका आहे ? म्हणूनच त्या घर दार सोडून, अशा ह्या गांवच्या त्या गांवाला–हवे प्रमाणें वाटेल त्याच्याशीं मैत्री करीत हिंडत आहेत ; दुसरं काय ?

**दपट**–त्यांच्या त्या पवित्र वेषाकडे जरा नजर द्या ! उगीच दोषारोप करण्यांत अर्थ काय ?

**तिरपिड**–अहो लक्ष काय–अगदीं बारकाईनं न्याहाळून पाह्यलं–समजलांत ! जें कांहीं आहे तें त्या भगव्या रंगांतच आहे. हवं तें करावं आणि त्यावर भगव्या–किरमिजी सोंदेगिरीचं पांघरूण घालावं म्हणजे झाली दृष्टीआड सृष्टी ! काय हो दपटशास्त्री तुरतुरे, तुम्हीं त्या दोघींचा पक्ष घेऊन आपल्या जिव्हाचापल्याची जी एवढी तुरतुर चालवली आहे तिचा अर्थ काय ?

**दपट**–भाषेचा अर्थ तुम्हांला कळत नाहीं, म्हणजे मोठंच आश्चर्य आहे ! अहो कमळ आणि त्याचं सौंदर्य ज्याप्रमाणें एकवटलेलीं असतात त्याच प्रमाणें भाषेचा अर्थ तिच्यांतच मिसळलेला असतो. तेव्हां मी एवढावेळ जें कांहीं बोललों

त्याचा अर्थ त्यांतच होता, हें तुमच्या सारख्या, व्याकरणावर चक्रा मारून तिरपिंड करणाऱ्या चक्करवे शास्त्र्याला कळूं नये हें मोठं आश्चर्य आहे!

**तिरपिंड**–कळला आतां तुमच्या बोलण्याचा अर्थ.

**दपट**–पक्की समजूत पटली ना?

**तिरपिंड**–हो–हो–अगदीं पक्की!

**दपट**–ती कशी काय?

**तिरपिंड**–त्या दोघी कमलिनी आणि तुम्हीं त्यांचं सौंदर्य! पण हें पहा बोकेशास्त्री, असलीं हीं कृत्यं ह्या पैठणांत तरी निदान चालायची नाहींत, समजलांत?

**दपट**–तुम्हीं किती क्षुद्रबुद्धी आहांत हो? असलीं म्हणजे कसलीं?

**तिरपिंड**–तीर्थविधिकरितां सकेशा विधवा आल्या असतां, त्यांचं वपन न करवितां, त्यांच्याशीं मन मानेल तसा व्यवहार करण्याची कृत्यं:–पण जाऊं दे! आतां जातों गांवांत, भरवतों सभा आणि मग बघतों तुमच्या चेष्टा!

**दपट**–हें पहा, उगीच तिरपिंड करीत चक्रा खात जाऊन माझ्या ऐवजीं, आपल्याच फजीतीच्या गमतीचं प्रदर्शन करण्यांत मतलब काय? त्या पाहिल्यातका–त्याच दोघी इकडे येत आहेत. त्यांची समक्ष गांठ घ्या म्हणजे त्यांची पवित्रता, त्यांची विद्वत्ता आणि त्यांचं आत्मज्ञान कसं आहे तें कळेल?

**तिरपिंड**–काय म्हणे त्यांची पवित्रता, विद्वत्ता आणि आत्मज्ञान पहा! अरुंधतीचेच दोन अवतार हे! आगलावा त्यांच्या त्या आत्मज्ञानाला! तें पेटत कसं नाहीं अजून?

**दपट**–म्हणजे, मोठंच आश्चर्य आहे! अहो, आग पेटली असं सांगणारा जो धूम्रदूत तो तुमच्या नाकातोंडांत जाऊन

तुमचं एवढं मस्तक फिरून गेलं असतां, अद्याप अग्नि पेटला नाहीं म्हणतां? आश्चर्य आहे! पाण्याच्या पृष्ठभागावर उठणाऱ्या बुडबुड्यांप्रमाणें दिसणारे हे तुमचे बटबटीत डोळे, आत्मज्ञानशून्यतेच्या थंडीनं गारठून, त्यांवर नेत्रोदकाचे थर थिजल्यामुळें, त्यांनां धग देऊन साफ करण्याकरतांच ह्या दोन अग्निशिखा इकडे येत आहेत असं मला वाटतं. घ्या–जरा शेक घ्या! म्हणजे अंजन घातल्याप्रमाणें डोळे साफ होतील. ( वेणु व अक्का येतात. )

**वेणु**–मिरजेस मला अनुग्रह देऊन समर्थ गेल्याला आज किती वर्षं झालीं. अद्याप त्यांचं दर्शन नाहीं. आतां जर दर्शन होणार नाहीं, तर अन्नग्रहण करायचं नाहीं असा माझा निश्चय झाला आहे.

**अक्का**–वेणु, माझाही संकल्प तसाच झाला आहे. एकनाथ महाराजांच्या देवळांत जाऊन, धरणं घेऊन बसायचा माझा विचार आहे! ( तिरपिड पुढें होऊन )

**तिरपिड**–कुठें, एकनाथ महाराजांच्या देवळांत? तुम्हीं तिथें धरणं घेऊन बसणार होय?

**वेणु**–कां बरं, तुम्हीं कोण?

**तिरपिड**–ओळखलं नाहीं वाटतं मला तुम्हीं?

**वेणु**–माणुस आहांत हें ओळखलं?

**तिरपिड**–म्हणजे?

**अक्का**–पशू नव्हेत, दुसरं काय?

**तिरपिड**–वैदिक ब्राह्मण आहें–समजलांत?

**वेणु**–सांगावं लागतं एवढं बरं आहे. पण आम्हाला तुमच्या त्या वैदिकपणाशीं काय करायचं आहे?

**तिरपिड**–काय करायचं आहे? ह्या तुमच्या डोल्यासह तुमच्यावर बहिष्कार टाकायचा आहे!

**अक्का**–काय म्हणंता, तो आमचा ठोल्या, अन् तुम्हीं कोण?

**तिरपिड**–शुद्ध वैदिक ब्राह्मण!

**वेणु**–हें वेदांत सांगितलं आहे वाटतं?

**तिरपिड**–तोंड किती करतेस! देवळांत पाय ठेवायचा यत्न तर कर–म्हणजे वेदांत काय सांगितलं आहे तें सांगतों.

**वेणु**–मग माझं मन देवळांत गेलं आहे असं समजून आतांच एखादी ऋचा म्हणून दूर व्हानात? कारण आपल्याला तें पोपटपंची ज्ञान मिळालेलं! अर्थ काय कोणाला ठाऊक! पण कायहो भट्टजीमहाराज, सध्यां तुम्हीं आणि आम्हीं कुठें आहोंत? अहो—

**देउळें म्हणजे नाना शरीरें। तेथें राहिजे जीवेश्वरें॥**
**नाना शरीरें नाना प्रकारें। अनंत भेद॥**
**चालती बोलती देउळें। त्यांमध्यें राहिजे राउळें।**
**जितकीं देउळें तितकी सकळें। कळलीं पाहिजे॥**

मग कसं काय? आपण देवळांतच नाहीं का?

**तिरपिड**–हो-हो! सागरगोटे कधीं कधीं द्राक्षंच मानावीं लागतात. (एकदम उद्धवासह रामदास पुढें येतात आणि दोघी स्त्रिया त्यांच्या पायां पडतात व साश्चर्य उभ्या राहतात.) वाहव्वा, ठीक, उत्तम-नामी जमलं हें त्रिदळ! त्रिदळ कसलं-हा त्रिफळा!

**दपट**–त्रिफळ्यानंच प्रकृति साफ होऊन मन स्वच्छ होतं. त्रिदल म्हटलं तरी तें त्रिगुणात्मकच असतं!

**रामदास**–मुलीनों, काय तंटा आहे! मी तंट्याचं निवारण करतों!

**तिरपिड**–हे आमचे मुंड मुंडलेले दपटशास्त्री आणि हे जटाधारी बोके सन्यासी! आतां काय उशीर! सांगा वेदांत आणि मारा दोघे दोघींना खाकोटीलान् दुसरं काय? उडवा पाखरं!

**रामदास**–पाखरंच उडायची! माणसं कधीं उडतांना पाहिली आहेत का!

**तिरपिड**–हो पुष्कळ वेळां!

**रामदास**–एकूण तुम्ही शुक्राच्या ताऱ्यावर वस्ती करणारे दिसतां! पण चुकतां तुम्ही! सर्व गोष्टी तो एकटा जगन्नियंता करतो.

**तिरपिड**–तें तुमचें ब्रह्मज्ञान पुरे करा! ह्या दोघींची कड घेऊन पुढें सरकलांत तें आपलं सरकणं पुरे करा आतां!

**रामदास**–तुमचं काय म्हणणं आहे?

**तिरपिड**–केशवपनाशिवाय विधवा स्त्रिया पवित्र मानिल्या जात नाहींत. त्यांनां देवळांत जाण्याचाच नव्हे तर देवाचं नमोच्चारण सुद्धां करण्याचा अधिकार नाहीं.

**रामदास**–काय, अधिकार नाहीं! काय हो, आपण वैदिक ब्राह्मण आहांतना?

**तिरपिड**–दिसत नाहीं का?

**रामदास**–कुठें लिहिलेलं दिसत नाहीं वाचायला!

**तिरपिड**–सांगितल्याशिवाय तें कुठें लिहिलेलं दिसतं कीं काय? मला बचंभट्ट ऊर्फ तिरपिड घे चक्करशास्त्री वेदांती असं म्हणतात.

**रामदास**–तुम्हांला मिळालेल्या टोंपण नांवावरूनच तुमचं वेदांताचं स्वरूप प्रकट होत आहे! असो. आपण काय म्हणतां? केस काढल्याशिवाय स्त्रियांनां पवित्रता येत नाहीं, असंच ना?

**तिरपिड**–पुन्हां पुन्हां काय हो विचारतां? तें असूं द्या. अधीं ह्या दोघींशीं आमचं भाषण चाललं असतां, मध्येंच पाचर मारल्यासारखें घुसून ‘ मी तंट्याचं निवारण करतों ’ असं म्हणालांत तें आधीं करा! मग पुढचा विचार पुढें.

**रामदास**–ह्या दोघी स्त्रिया श्रीच्या शिष्यिणी आहेत. तेव्हां त्यांचा जो छल तोच माझा असं मी समजतों.

**तिरपिंड**–हं चालू द्या तरमग श्रींचं म्हणणं काय आहे तें?

**रामदास**–ऐका तरमग वेदांती भट्टजी!

**तिरपिंड**–हे कान पुढें केले आहेत. चालू द्या!

**रामदास**–कान लांबल्यासारखे दिसतात खरेच! हें पहा, अहो भट्टजी महाराज, परमार्थाची वाट सुगम करणारी महत्वाची पायरी म्हणजे आत्मज्ञान! चौऱ्याशी लक्ष योनींच्या फेऱ्यांत प्राणी सांपडला म्हणजे तो पापपुण्याप्रमाणें निरनिराळे देह धारण करतो. नरदेह धारण करण्यास पुष्कळच पूर्वपुण्याई पाहिजे.

**तिरपिंड**–हें शिक्षण बाल्यावस्थेंतच मिळतं. आपण हें आम्हाला शिकवण्याचं कारण नाहीं.

**रामदास**–देह हा अनित्य असून आत्मा हा नित्य आणि सर्वव्यापक आहे.

**तिरपिंड**–आमचे वेद असंच म्हणतात.

**रामदास**–ह्याच न्यायानं देव जसा देवळांत तसा आत्मा शरीरांत असायचा हें ठरतं. आत्मा जरी एक आहे, तरी तो संयोगपरत्वें गुणांमध्यें भिन्नत्व पावतो. उंसाच्या शेताला पाणी घातलं असतां त्याच्या अंगीं माधुर्य येतं! पण तेंच पाणी विषवल्लीला पाजलं असतां त्याचा विषरस बनतो. म्हणून आत्म्याच्या गुणांत जर कांहीं फेर आढळत असेल तर तो संगतीमुळेंच असला पाहिजे. जीवात्मा आणि परमात्मा यांत भिन्नत्व नाहीं. भेद भ्रामक आहे. म्हणून अपूर्णज्ञानी जे आहेत त्यांना द्वैत कीं अद्वैत असा विकल्प उत्पन्न होतो. माया आणि ब्रह्म यांची सांगड कशी बनली आहे, दृश्य तें मिथ्या आणि विनाशी कां, ह्या गूढ विचारांचं ज्ञान झालं असतां, अद्वैताच्या जैजैकारानं आत्मा

डोलूं लागतो. जगाचा उत्पादक आणि चालक अशा परमेश्वराला मूढजन विसरून, कोत्या समजुतीनं निरनिराळ्या देवता मानतात. जितक्या प्रकृति तितक्या विकृति. ह्याच न्यायानं असंख्य देवता अस्तित्वांत आल्या आहेत.

**तिरपिंड**–म्हणजे आत्मा हा देव आणि देह हें त्याचं देऊळ असंच किं नाहीं तुमचं म्हणणं ?

**रामदास**–हेंच सत्य आहे.

**तिरपिंड**–मग ह्या दोघींनां धरणं धरून बसण्याकरितां नाथमंदिरांत जाण्याची कांहीं जरूर नाहीं.

**रामदास**–हें न्यायानंच ठरलं ! पण कायहो, परीट कसे असतात आणि त्यांची कृती कशी असते हें तुम्हांला माहीत आहे का ?

**तिरपिंड**–ते अडाणी असून, कपडे धुतात हें माहीत आहे.

**रामदास**–ते जसे अडाणी असतात तसाच त्यांचा धंदा, लोकांचे कपडे आपल्या घरीं जमवून, घर भरून, पुन्हां ते ज्याचे त्याला परत दिल्यानंतर घर रिकामें करणें हा जसा असतो, त्याचप्रमाणें बेअकली लोकांची गोष्ट आहे. ते लोक म्हणजे निवळ धोबीच. दुसऱ्यांचे चांगले विचार ऐकायचे, कृती पाह्यच्या पण पुन्हां त्यांचं विचारगृह परटासारखं रिकामं तें रिकामंच. तें असो. तें तुम्हांला कळायचं नाहीं म्हणा ! पण न्याय काय आहे तो तुम्हांला कळला ?

**तिरपिंड**–हो-हो-मलाही ह्या न्यायाचे असले हे निराकार ईश्वरवादी आमच्या नाथांच्या पवित्र देवळांत ह्या झगझगीत सोंवळ्या पवित्र स्त्रियांसह यायला नको आहेत. पण कायहो, पायांत पादुका, हातीं माळ, गळ्यांत मेखळा, मस्तकीं जटाभार, त्यावर टोप, काखेला कुबडी, अंगावर हुरमुजी रंगाची वस्त्रं

आणि पाठीशीं गलोल—असा वेष धारणकरून वेदांत सांगत हिंडतां, तेव्हां हा वेदांतच एखादा आश्रम आपल्याला आढळला आहे कीं काय ?

**रामदास**—ह्या आश्रमाला ब्रह्मचर्याश्रम म्हणतात. आम्हीं रघुपतीचे दास असून, स्वेच्छाविहारी आहों. आणि म्हणूनच खेळण्याला हा गलोल बाळगला आहे.

**तिरपिड**—आपण ह्याचा अभ्यासही केला असेल !

**रामदास**—हो-हो !

**तिरपिड**—तर मग ती घार उडते आहे तिला पाडा पाहूं खडा मारून ! ( रामदास घार पाडतात. ) ब्रह्मचारी आश्रमांत अशी हत्या करावी असं रघुपतीनींच तुम्हांला सांगितलं आहे वाटतं ? ह्या पापाबद्दल तुम्हांला सक्षौर प्रायश्चित्त घेतलं पाहिजे

**दपट**—( स्वगत ) ह्या तिरपिड्याची काय शक्कल आहे पहा ! मुद्दाम हत्या करवून दक्षणा उपटण्याची खूपच युक्ति काढलीन लेकानं !

**रामदास**—सांगाल तसं प्रायश्चित्त घेण्याला मी तयार आहें. हा जटाभार, ह्या मिशा, ह्यांची किंमत कांहीं नाहीं. प्रेतदहनाच्या आधीं हे केशच भुर्रकन जळणार ! परंतु सक्षौर प्रायश्चित्त घेतलं असतां, केलेल्या पातकाचं क्षालन होतं काय ?

**तिरपिड**—हें तर शास्त्रानं स्वच्छ सांगितलं आहे !

**रामदास**—ठीक आहे, करा तयारी प्रायश्चित्ताची ! प्रायश्चित्त घेतल्याबरोबर घार उडून स्वस्थानीं गेली पाहिजे.

**तिरपिड**—शास्त्राज्ञा प्रायश्चित्त देण्यासच आहे. मृतजीव उठणार कसा ?

**रामदास**—असं काय ? तुम्हींच पोटभरू भिक्षुकांनीं श्रीनाथ महाराजांस एक्कावन प्रायश्चित्तं दिलीं आणि त्यांनीं तीं घेतलीं

परंतु हा रामदास तसा नव्हे. मृतजीव उठतो कीं नाहीं तें पाहूं! ( घारीस उचलून ) घारूबाई, तुम्हीं पूर्वी आकाशमार्गीं जसा विहार करीत होतां त्या प्रमाणेंच स्वस्थलीं जा! ( घारीस वर फेंकतात व ती उडून जाते. )

**तिरपिंड**–(नमस्कार घालून) महाराज, क्षमा करा! आपणांस न ओळखतां, मी आपल्याशीं वितंडवाद केला.

**रामदास**–तुम्हीं साक्षात् भूदेव, मूर्तीमंत वेद आहांत. श्रीराम कर्ता समर्थ आहे. तो काय न करील! घार जिवंत झाली हें सामर्थ्य तुमचंच आहे.

**तिरपिंड**–अपराध माफ करणं आपल्याकडे आहे.

**रामदास**–भट्टजी महाराज, आतां ह्या श्रींच्या मुलींचं वपन करणं नकोना? हें पहाः—

**अभंग.**

**अंतरी गुरुवचन। बाह्य नापीत वपन ॥ १ ॥**
**अंतर बाह्य शुद्ध झाला। रामदर्शनें निवाला ॥ २ ॥**
**मन मुंडिल्या उन्मन झालें। शिर मुंडिल्या काय केलें ॥३॥**
**रामदासी तीर्थविधी केला। रामीं पिंड समर्पिला ॥ ४ ॥**

आतां तरी ह्या मुली पवित्रच आहेतना?

**तिरपिंड**–हें सांगणं नको. (एक वाटसरू येतो.)

**वाटसरू**–( नमस्कार करून ) जांबेंतील सूर्याजीपंतांचे चिरंजीव नारायणबावा आपणच काय?

**रामदास**–होय! आपण अंबाड प्रांतीचे आहांत हें मी ओळखलं!

**वाटसरू**–तुम्हीं असे तीर्थयात्रा करीत फिरून स्वधर्म-जागृती करीत आहां त्याचाच फायदा, दक्षिणेंत पुणें प्रांती वाढलेला शिवाजी घेत असून, त्यानं एका मागून एक किल्ले, प्रांत

काबीज करण्याचा सपाटा चालविला आहे. रामदासी पंथाच्या साह्यानं ऐक्यभाव वाढवून, स्वदेशांत स्वराज्यस्थापना करण्यास जी तुमची मदत सुरू आहे ती योग्यच आहे; परंतु तुमच्या करतां, तुमचे श्रेष्ठ बंधु व मातोश्री बहुत श्रमी होऊन आज चोवीस वर्षे सारखा शोक करीत आहेत. त्या शोकानं मातोश्रींचे डोळेही गेले. तेव्हां आतां त्यांच्या भेटी घेऊन त्यांचं समाधान करणं योग्य आहे.

**रामदास**—फार चांगलं! न मातुः परदैवतं! त्या उभयतांच्या भेटीस जातों.

**वाटसरू**—उत्तम आहे! आम्हींही तीर्थयात्रा करीत हिंडत आहोंत. अनायासें तुमची गांठ पडली म्हणून हकीकत कळविली. आतां आम्हीं येतों.

**रामदास**—श्रीराम समर्थ! आम्हींही घरीं जातों.

**उद्धव**— **श्लोक.**

**सदा सर्वदा सज्जनाचेनि योगें ॥**
**क्रिया पालटे भक्ति भावार्थ लागे ॥**
**क्रियेवीण वाचाळता ते निवारी ॥**
**तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

(**रायगड** किल्ल्यावरील **बाग**. मधुमालतीच्या वेलाच्या झोंपाळ्यावर मध्यें **सईबाई**, एका बाजूला **चंद्रा** व एकाबाजूला **गिरजा** अशा बसल्या असून एक दासी झोंके देत आहे असा प्रवेश उघडतो.)

**सई**—ही वेल फुलांनीं फुलल्यामुळें किती मधुर सुगंध सुटला आहे हा?

**चंद्रा**—आणि ह्या पुष्पांतला मध खाण्याकरतां भुंग्याच्या

रांगा गुणगुणत असल्यामुळें, ओव्या म्हणण्याला ही एक स्वाभाविकच सूरदार वेल बनली आहे.

**सई**–हं आतां ओवी म्हणायची कोणाची पाळी ?

**गिरजा**–चंद्रा बाईची !

**सई**–म्हणा चंद्राबाई !

**चंद्रा**– **ओवी.**

**मुखकमलीं नेत्रकमल ॥ तसा पोटीं पुत्र विमल**
**होऊनीया यवन सकळ ॥ निर्दाळील**

**सई**–चंद्राबाई, कोणाच्या पोटीं असला मुलगा होणार ?

**चंद्रा**–आपल्या–बाईसाहेब !

**सई**–कशावरून पण म्हणतां हें ?

**गिरजा**–मी सांगूका ?

**सई**–हं !

**गिरजा**–पण ओव्या म्हणायची एक पाळी झाली म्हणजे सांगेन !

**सई**–करा तर मग तुम्ही सुरवात !

**गिरजा**–आपलीच पाळी आहे आतां बाईसाहेब !

**चंद्रा**–तुम्हीं का म्हणांना अगोदर गिरजाबाई ?

**सई**–खरंच गडे तुम्हींच म्हणा अगोदर ! मी मागून म्हणेन !

**चंद्रा**–गिरजाबाई, म्हणतांना तुम्ही ?

**सई**–खरंच म्हणा गडे !

**गिरजा**– **ओवी.**

**राणी चोरून खाई माती ॥**

**सई**–कोणाची राणी ?

**गिरजा**–दिलीप राजाची राणी सुदक्षिणा गर्भार असतांना माती चोरून खात असे.

**चंद्रा**–मग पुढें ?

**गिरजा**– **ओवी.**

**राणी चोरुन खाई माती ॥**
**परी उमगे चोरी पति ती ॥**

**सई**–ती हो कशी ?

**दासी**–ह्यवं काय बाईसाव ! माझं धनी हैतं पक्‍क रामाचं श्येवक. त्यास्नी कांदा, लसुन कंदीबी खानं न्हाई ठावं !

**सई**–अन् मग तूंही खात नसशील !

**दासी**–तसं नव्हं बाईसाव ! माझ्या बापाच्या घरची मला ल्हानपनापुन त्ये खायची हाये चट—

**सई**–मग तूं तें चोरून खातेस होय ?

**दासी**–योकदा खाल्लं व्हतं ! पुन्हा रामाचं नांव ! धन्यास्नी त्ये तवाच उमाग्लं !

**सई**–तेंग कसं ?

**दासी**–माज्या संग त्ये पिरमामंदीं आलं तवा !

**सई**–ओवी संपली नाहीं अजून गिरजाबाई !

**गिरजा**– **ओवी.**

**राणी चोरुन खाई माती ॥ परी उमगे चोरी पति ती**
**मुका हेर बात्मी कथिती ॥ शिवाजी राजानां**

**सई**–इश्श ! बऱ्याच आहांत हो ! दिलीपाची ओवी म्हणतांना तिकडचं नांव कशाला मधें ! मी का चोरून माती खातें ?

**चंद्रा**–मग काय, दिलीप राजाच्या ऐवजीं शिवराज म्हटलं तर नाहीं का चालणार ?

**सई**–तें कसं बरं चालेल !

**गिरजा**–अगदीं गजगतीत चालेल बरं !

**सई**–सांगा पाहूं कसं तें ?

**चंद्रा**–गोसेवा आणि ब्राह्मणप्रतिपाल यांपासून दिलीप राजाला जशी रघु नांवाच्या पुत्राची प्राप्ती झाली तशीच.

**सई**–आलं हो लक्षांत माझ्या !

**गिरजा**–मग आतां आपण म्हणतांना ओवी ?

**सई**–तुमच्यासारखी अलंकारिक नाहीं बाई मला म्हणतां यायची ! ऐका अं माझी आपली वेडीवांकडी ओवी !

**ओवी.**

**शमी प्रसवे अग्नीज्योती ॥ शमी निकटी गणपती**
**शमी दोन्ही संभाळीती ॥ पती पुत्र**

**शिवाजी**–( झाडाच्या आडून ) अरेरे ! भावी स्थितीचं हें द्योतकच आहे असं म्हणायला काय हरकत आहे ? कोणच्याही तऱ्हेच्या विलासांत व्यर्थ वेळ न दवडतां, स्वबांधवांकरतां, अश्रांत श्रमानं स्वराज्य स्थापण्याच्या अनंत खटपटी करीत असतां, माझ्या स्त्रियेच्या पोटीं देशाच्या शत्रूला जाळून भस्म करणारा अग्नि उत्पन्न न होतां ज्योतीचीच उत्पत्ती व्हावी काय? आतांच्या ह्या ओवींत 'अग्नीज्योती'च्या ऐवजीं 'अग्नीमूर्ति' आणि तिसऱ्या चरणांत 'शमी'च्या ऐवजीं 'जगा' असं जर सरस्वतीनं वदवलं असतं तर मला मोठा आनंद झाला असता. असो. जें व्हायचं तें चुकायचं नाहीं. पण आपण असे व्यर्थ कुतर्क घेण्यांत अर्थ काय? आपण भविष्यवादी थोडेच आहोंत?

**गिरजा**–बाईसाहेब, तें त्या बकुळीच्या झाडाआड काय लकाकतं आहे तें बघीतलंत का?

**चंद्रा**–हत्ती आपलं गंडस्थळ त्या झाडावर घांशीत असतां, त्याचं मस्तकभूषण त्याला आडकून राहिलं असून तें चमकतं आहे असं दिसतं ?

**दासी**–अव तसं नव ! शिकारखान्या मधला राजहंस सुटला हाये ! त्याच त्ये पर चमकत हायती !

**सई**–चंद्राबाई, स्वारीच इकडे आली आहे! आपलं इतक्या वेळचं बोलणं ऐकलं वाटतं सारं?

**गिरजा**–खरचं महाराजच आले. आम्हीं येतों आतां!

( सईबाई शिवाय दोघी झोंपाळ्यावरून उतरतात इतक्यांत शिवाजी पुढें होतो. )

**शिवाजी**–कां उतरलांत कां? चालूं द्या तुमच्या ओव्या!

**दासी**–महाराज, आतां बाईसाब दमल्याती! वादुळच्या ओव्या म्हणत बसल्या हैत!

**शिवाजी**–मग तुझं काय म्हणणं आहे? झोंपाळ्यावरून खालीं उतरवून वाड्यांत नेऊं होय? छेः आपल्याला हें दुप्पट ओझं नाहीं उचलायचं!

**दासी**–मंग म्यानासकट तरवार कशी उचलता? त्ये नव्हंका दुप्पट वझं?

**सई**–पुरेग! तोंड किती करावं!

**दासी**–म्हाराजांचा पक्ष म्हाराणीनींच घेतला पाहिजे. चलावं चंद्राबाई, गिरजाबाई, आपुन जाऊंया ( तिघी जातात. )

**सई**–दासी बोलली तें खोटं का?

**शिवाजी**–उडी नाहीं का मारता येत?

**सई**–शिडी नसेल तर उडी!

**शिवाजी**–खरं आहे बुवा! ( तिला उतरवतो. ) पण आधीं हें तोंड पुसा पाहूं? किती तरी लडवडलं आहे.

**सई**–कशानं तें?

**जिवाजी**–मातीनं!

**सई**–म्हणजे, मी पोर का आहें माती खायला!

**शिवाजी**–पोर नाहीं म्हणूनच तर ठीक आहे! बाकी आतांशे माती घशांत उतरवण्याचा जो सपाटा सुरू आहे तो मात्र मोठा अजब आहे बुवा!

**सई**–कुणी, मी का? हें आपण करून दुसऱ्यावर ढकलणं चांगलं!

**शिवाजी**–मी का माती खातों?

**सई**–नाहीं का?

**शिवाजी**–ते कसं?

**सई**–आज हा किल्ला घेतला, उद्यां दुसऱ्याला मोर्चा बांधायची तयारी, परवां विजापूरकरांवर स्वारी, तेरवां मोंगल चुरडायचा, त्याच्या तेरवा दिल्ली काबीज करायची, हेरवा बेदरशाही बुडवायची-असं जें चालवलं आहे तें दिसेल ती जमीन आपल्या वशांत उतरवणंच नव्हे का? मग आतां कोण माती खातं?

**शिवाजी**–आम्हांला जरी तुम्ही आडवलं आहे, तरी आम्हीं म्हणतों त्या बाबतींत परीक्षा देण्याला तयार आहोंत?

**सई**–ती कशी?

**शिवाजी**–आम्हीं खातों का तुम्हीं खातां ह्याची साक्ष तोंडाच्या वासावरून येईल. घ्या आमच्या तोंडाचा वास!

**सई**–आडवण्याची चांगली युक्ती काढली! पुरुषांपुढें स्त्रियांचा टिकाव कितीसा लागणार? अबलांनीं बलवंतांनां कधीं हटवलं आहे का?

**शिवाजी**–शंका आहे कीं काय? स्त्रीरूप शक्ति नसेल तर शूर पुरुष काय करणार? वेदधर्म न मानणाऱ्या हूणांचं निर्दालन करण्याला परमेश्वराला प्रत्यक्ष जगन्माता शक्तीची सेवा करून तिला वश करून घ्यावी लागली आहे. मग आम्हांसारख्या मानवांचा तिथें काय पाड! आम्हीं आमचा हा देश यवनांच्या तडाक्यांतून सोडवून स्वदेशबांधवांनां यथेच्छ विहार करण्याला मोकळीक करीत आहों ती तुम्हीं:—

**सई**–गडे पण आतां पुरे नाहीं का झालं हें ! जाऊं का मी ? थट्टा किती करायची ? ( रुसते. )

**शिवाजी**–अहाहा ! आतां तर चेहेऱ्यांत जास्तच खुलावट दिसूं लागली ! रात्रीचा नाश होत असतां एकदोन तारे अर्धवट दिसत आहेत, इतक्यांत सूर्यकिरणांनीं त्या दिशेला दिसणारा तो पांडुरवर्ण–हा इथें दिसतो आहे. अगदीं हुबेहुब दिसतो आहे.

**सई**–अजून नाहीं का पुरे होत ?

**शिवाजी**–झाला–आतां मात्र अगदीं पुरा रात्रीचा नाश होऊन पक्का सूर्योदय झाला. सूर्योदयाबरोबर सूर्यकमलं प्रसन्न होतात आणि त्यांतला मकरंद प्राशन करण्यांत गढलेले भुंगे–सूर्यास्तामुळें बंदीवान होऊन मुक्ततेसाठीं परमेश्वराची प्रार्थना करीत असतात; परंतु सूर्योदय झाल्याबरोबर त्यांतून बंधमुक्त होण्याऐवजीं त्यांतला मकरंद पुन्हां आधाशीपणानं ते प्राशन करीत बसतात. त्यावेळीं ते सुवर्णाच्या तबकावर चमकणारे नीलमणीच दिसतात. तें जसं जगांतलं एक कौतुक आहे–त्याचप्रमाणें–परंतु त्या कौतुकाचाही धिःकार करणारे हे तुमचेः—

**सई**–दिल्लीची बादशाही रसातळाला कशी पोंचेल ह्या विवंचनेंत नेहमीं निमग्न असलेलं तें मस्तक, हबशांचा चुराडा उडवण्याविषयीं संधी साधणारे ते डोळे, विजापूरचं तक्त पालथं घालण्यासाठीं स्फुरण पावणारे ते बाहु, स्वराज्य आणि स्वधर्मस्थापना करण्याला योग्य अशी ' मींच एक आहें ' असं म्हणून त्या लालसेनं तढाढणारी ती छाती, गोब्राह्मणांचा छल करणाऱ्यांच्या उरावर थैमान करायला नेहमीं पवित्र्यावर असलेले ते पायः—

**शिवाजी**–पुरे आतां तें आपलं कवित्व !

**सई**–पुरे झालं का आपलं कवित्व ?

**शिवाजी**–ह्या जाईच्या लतामंडपाची कींव येते म्हणून पुरे करतों ! आपण जशा तिकडे उभ्या आहांत तसाच हाही बराच वेळ आपल्या सुगंधासह आपल्याला खडी ताजीम देण्याची वाट पहात उभा आहे. ( तिचा हात धरून तिला लतामंडपांत बसवतो. )

**सई**–म्हणजे, मी एकटीच का बसूं इथें ?

**शिवाजी**–एकट्या कशानं ? आपल्याला खडी ताजीम देणारा हा सुगंध आहेना इथें दुसरा !

**सई**–पुरे आतां तो विनोद. ( ती शिवाजीला आपल्या शेजारीं हात धरून बसवते. ) श्रीतुकाराम महाराजांकडे धाडलेले लोक परत आले का ?

**शिवाजी**–पंडितराव आणि मुजूमदार अजून परत आले नाहींत !

**सई**–पण ती दासी कां बरं तिकडून धांबऱ्या धांबऱ्या इकडे येत आहे ? ( दासी येते. )

**दासी**–बाईसाबांना–आईसाब वाड्यांत बोलावत्याती !

**शिवाजी**–काय काम आहेग ?

**दासी**–शिकारखान्याप जायाची तयारी झाली हाये ?

**सई**–आलें हो ? तूं हो पुढे! ( दासी जाते. )

**शिवाजी**–तुमचे डोहाळे आहेत तरी किती प्रकारचे ? तुम्ही सध्यां तरुणपणा सोडून बालपणा धरला आहेसा वाटतो !

**सई**–तें कसं ? म्हातारी का मी झालें आहें ?

**शिवाजी**–म्हातारपण आणि बाळपण सारखंच. तरुणपण हा त्या दोहोंतला सांधा आहे. स्त्रियांचं तरुणपण म्हणजे एक मूल होईपर्यंतच. कारण, तिथेंच त्यांची वाढ खुंटते आणि त्या

म्हातारपणाकडे धावूं लागतात. म्हातारपणाचा शेवट म्हणजे बालपणाचा आरंभ. सूर्य उगवून ऐन मध्यावर आला म्हणजे तो तारुण्यांत असतो ; परंतु मग त्याला वृद्धत्व येऊं लागून तो आपल्या दृष्टीआड होतो आणि पुन्हां बाल्यावस्थेंत दृष्टीस पडतो. तद्वतच हें आहे. बरं पण हे कोण बरं इकडे येत आहेत ?

**सई**—मी जातें आतां. सासुबाई वाट बघत असतील ! पंडितराव आणि मुजूमदारच इकडे येताहेत.

**शिवाजी**—श्री तुकाराम महाराजांकडूनच आले ते परत. बरं जा तुम्हीं. काय हकीकत आहे ती कळवीन मग. पोंचवायला येऊं कीं काय ?

**सई**—कोणाला—मला का ? अन् इकडून का येणं व्हायचं ? नको—इतके श्रम नकोत. शत्रूला धूळ चारून स्वराज्य स्थापण्याचे नेहमीं श्रम चालले आहेत तेवढे पुरेत.

**शिवाजी**—कां बरं, त्या श्रमांच्या पुढे हे श्रम म्हणजे त्यांचा उत्तम मोबदलाच नव्हेत का ?

( **सईबाई** जाते व **पंडितराव** आणि **मुजूमदार** येतात व मुजरा करून उभे राहतात. )

**पंडित**—पालखी, अब्दागीर, घोडा, जडजवाहीर वगैरे सर्वांकडे नुसत्या नजरेनंही न पाहतां, त्यांचा तिरस्कार दर्शवून श्रीतुकाराम महाराजांनीं आपल्या खऱ्या साधुत्वाची साक्ष पटवली असं म्हणण्याला हरकत नाहीं.

**शिवाजी**—काय, त्यानीं ह्यांपैकीं कांहीं एक न घेतां, तिरस्कार दर्शवला ?

**मुजूमदार**—सरकार, तिरस्कार एवढंच नव्हे तर त्यांच्या कुटुंबानं दागिने घेतलेले पाहून, गोमांसाची त्यानीं त्यांनां उपमा दिली आणि ते परत आमच्या स्वाधीन करून 'मी ह्या अकाबाईच्या

फेऱ्यांत सांपडूं इच्छित नाहीं ' असं ते म्हणाले आणि त्यानीं सरकारला देण्याकरतां म्हणून हें एक पत्र दिलं आहे.

**शिवाजी**–( पत्र घेऊन वाचतो. )

**पत्र.**

लोडिस्ते बोलिस्ते पलंग सुपती ।
परी नाहीं लंगोटी नेसावया ॥ १ ॥
रिद्धि सिद्धि दासी कामधेनु घरीं ।
परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ २ ॥
पुसाल जरी आम्हां वैकुंठीचा वास ।
परि नाहीं रहावयास स्थळ कोठें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं राजे वैकुंठीचे ।
परि नाहीं कोणाचे उणे पुरे ॥ ४ ॥
शरण असावें रामदासालागीं ।
नमन साष्टांगीं घालीं त्यांशी ॥ ५ ॥

महाराजांनीं आज्ञा केल्याप्रमाणेंच करावं झालं. श्रीसमर्थ रामदासांना आतां शरण जाऊन, श्रीतुकाराम महाराजांच्या आज्ञेप्रमाणें अनुग्रह घ्यावा. मुजूमदार, पंडितराव, समर्थांचा शोध करून त्यांच्या दर्शनाला उदयीक निघण्याची तयारी करायची.

**दोघे**–जशी आज्ञा. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

( जंगल-रस्त्यावर रामदास येतात. )

**रामदास**— **श्लोक.**

निजध्यास तो सर्व तूटोनि गेला ॥
वळें अंतरीं शोक संताप ठेला ॥
सुखानंद स्वानंद भेदें बुडाला ॥
मना निश्चयो सर्व खेदें उडाला ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ.—

आपण आर्य असतां, आर्यावर्तरूप जी कामधेनु ती आपल्या ताब्यांतून गेली असं उगाच खोटं समजून, आपल्याला अमृततुल्य गोरसांत स्वतंत्रपणें भाकरी खायला येत नाहीं म्हणून परक्याजवळ ताक मागण्याकरतां दांत विचकायचे—म्हणजें आर्यत्वचिंतामणीला कांच समजून, सेवकत्वाची गुलामगिरीनं थट्टाच करणं नव्हे काय ? अहो, तुमचे अंतरात्मे जे रामरूप होऊन बसले आहेत—त्यांच्याशीं ह्या विषयांत थोडासा वादविवाद करा—म्हणजे तुम्हीं कोण आहांत आणि तुम्हांला अशा ह्या भ्रष्टतेच्या काळीं काय केलं पाहिजे हें तुमचं तुम्हालाच कळेल. सध्यांच्या काळीं, सोंवळ्यांत बसून नुसती स्नानसंध्या करून धर्म राखूं—असं जर कोणी म्हणेल आणि मूळ वैदिक तत्वांवर रूढीच्या चढलेल्या कवचाच्या अनुरोधानं सर्व वागूं लागतील तर तें करणं मूर्खपणाचं आहे असं सध्यांच्याकाळीं सिद्ध करतां येईल. संध्यावंदनाचा जो उद्देश आहे, तो स्वराज्यस्थापना झाल्यावर पार पडण्यासारखा आहे. त्याला शांतता पाहिजे; परंतु जिथें उदंड राजकारणांमुळें जेवायला सुद्धां वेळ नाहीं तिथें जातीमत्सर, सोंवळं—ओवळं, आणि बहिष्कार—ग्रामण्यं कसलीं करीत बसतां ? शूद्राचा ब्राह्मण आणि ब्राह्मणाचा शूद्र स्वक्रियाकर्मानं होऊं शकतो. हें मनांत धरून, आमचे देशबांधव मत्सर सोडून ऐक्यांत जर आमच्या पराक्रमी शिवराजाला मदत करतील, तर मत्सरानं परगृहीं दवडलेली कामधेनु हां हां म्हणतां आपल्या ताब्यांत घेतां येणार आहे. म्हणून आज बरेच दिवस माजलेलं हें यवनांचं बंड दुखंडून स्वराज्यस्थापनेकरतां प्रत्येकानं दंड थोपटून—रणमस्तीच्या आखाड्यांत शत्रूवर, स्वतःच्या स्वातंत्र्याकरतां—भाला रोखून उभं रहावं आणि:— ( पडद्यांत उद्धव म्हणतो. )

**श्लोक.**

मना गूजरें तूजला प्राप्त झालें ॥
परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥
सदां ऐकतां पाविजे निश्चयासी ॥
धरी सज्जनी संगती धन्य होसी ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ.

अहाहा–हे आमच्या उद्धवाचे शब्द किती खरे आहेत बरं ? (उद्धव येऊन नमस्कार करितो.) उद्धवा, कशी काय कामगिरी बजावलीस ?

**उद्धव**–समर्थांच्या आज्ञेप्रमाणं मी आणि कल्याणस्वामीनीं कोंकण आणि कोळवण ह्या दोन प्रांतांत, स्वधर्मवात्सल्य आणि ऐक्यभाव यांची प्रेरणा करून त्या प्रांतांतून परस्परें शिवाजी राजाला मदत करण्याबद्दल विश्वसनीय वचनं घेऊन आलों आहों. कोंकणांतले सर्व किल्लेदार मात्र अद्याप यवनांचंच वर्चस्व कायम आहे असं मानीत असून, प्रजा शिवरायांचं श्रेष्ठत्व मानूं लागली आहे; पण हा जो–अधिकारी आणि प्रजा ह्यांच्यांतला भेद तो अद्याप प्रसिद्ध झाला नसून, यवनांचं निशाण त्या अधिकाऱ्यांनां जितकं सतेज दिसतं आहे तितकंच तें प्रजेला निस्तेज दिसूं लागलं आहे.

**रामदास**–हें तूं कशावरून म्हणतोस ?

**उद्धव**–त्या प्रांतांत यवनराजाविरुद्ध अंतस्थ सुरू असलेल्या मसलती आणि कट, शिवरायांचा छापा आला असतां, यजमानातर्फे लढायला उभं राहून हवेंत बंदुका मारणं आणि ऐन फत्ते होण्याच्या समयीं धीर सोडून पळाल्याचा ऐभाव दाखवून शिवराय.च्या लोकांस वाट देणं.—असे जे प्रकार सुरू आहेत त्यांवरून मीं तसं म्हणतों.

**रामदास**–बरं तें असो; पण तूं हिकडे कसा आलास? कल्याण कुठे आहे?

**उद्धव**–मातोश्रींच्या दर्शनाला स्वामी गेले आहेत, अशी रस्त्यांत बातमी लागल्यामुळें इकडे आलों. कल्याणस्वामी त्या पलीकडच्या नदीवर स्नान करून येताहेत. मीं पुढें शोध करण्याकरितां आलों.

**रामदास**–ठीक आहे. हेंच आमचं गांव. तें पहा आमचं घर. आपण आल्याची श्रीरामनामोच्चारानं जागृतता करण्याकरतां पुढें हो.

**उद्धव**– **श्लोक.**

**विचारूनि बोले विवंचूनि चाले ॥**
**तयाचेनि संतप्तयोगें निवाले ॥**
**बरें शोधिल्यावीण बोलों नये हो ॥**
**जनीं बोलणें शुद्ध नेमस्त राहो ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ.

( **राणुबाई** पडद्यांत )–अग घरांत कोण आहे? बाहेर गोसावी आला आहे त्याला भिक्षा घाला!

( **राणुबाई** ओटीवर बसली आहे असा प्रवेश उघडतो, **रामदास** पुढें होऊन )

**रामदास**–हा गोसावी धान्याची भिक्षा घेणारा नसून वडलांच्या आशीर्वादाची घेणारा आहे.

**राणुबाई**–कोण, माझा नारायण आला कीं काय?

**रामदास**–होय मींच आलों आहें आई! (नमस्कार घालतात. राणुबाई त्याला मिठी मारते. त्याचें डोकें हुंगते.)

**राणुबाई**–नारायणा, तूं बराच मोठा झालास? पण आतां मीं तुला कोणच्या दृष्टीनं पहावं?

**रामदास**—आई, दृष्टीलाग काय उशीर! आत्मदृष्टी तर तुला आहेच. आतां ही घे चर्मदृष्टी. ( तिच्या डोळ्यांवरून हात फिरवितात व तिला दृष्टी येते. )

**राणुबाई**—नारायणा, केवढा तरी तूं हा झालास? देशांतरीं फिरून ब्र्याच भूतचेष्टा शिकून आलास? ह्या भूतचेष्टा करवणारं कोणचं बावा भूत तूं साध्यकरून घेतलं आहेस?

**रामदास**—आई ऐक:—

**पद.**

होतें वैकुंठीचें कोनीं। शिरलें अयोध्या भूवनीं ॥
लागे कौंसल्येचे स्तनीं। तेंची भूत गे माय ॥ १ ॥
जनकाचे अंगणीं गेलें। शिवाचें धनु भंगिलें ॥
वैदेही अंगीं संचारलें। तेंची भूत गे माय ॥ २ ॥
पितयाचे भाकेशीं। कैकेयीचे वचनाशीं ॥
मानुनि गेलें अरण्याशीं। तेंची भूत गे माय ॥ ३ ॥
चौदा संवत्सर तापसी। अखंड हिंडे वनवासी ॥
भेटे मग भरतासी। तेंची भूत गे माय ॥ ४ ॥
सर्वां भूतांचें हृदय। नाम त्याचें रामराय ॥
रामदास नित्य गाय। तेंची भूत गे माय ॥ ५ ॥

( गंगाधरपंत हातांत यज्ञोपवीत धरून येतात त्यांस रामदास नमस्कार घालतात. )

**गंगाधर**—बापा, शाबास आहे तुझी! आमचं समस्त कूळ तूं उद्धरलंस. आतां:—

**श्लोक.**

संपन्न लावण्य तारुण्य नारी ॥
कौशल्यता वैभव चित्त हारी ॥
एकांत-काळीं पडतां समंधु ॥
आसक्त नोहे तरि धन्य साधु ॥ १ ॥

**रामदास—**

**श्लोक.**

**स्वर्गांगना ते सन्मूख आली ॥**
**लावण्य रूपीं दृष्टी निघाली ॥**
**मुक्ताफळीं शुक्र उर्वेचरांसी ॥**
**परंतु आरण्य मिरासि त्यासी ॥ १ ॥**

आजपर्यंत ब्राह्मण्य राखून आपल्या दर्शनाला आलों आहें!

**गंगाधर**—नारायणा, धन्य आहेस तूं! आज चोवीस वर्षांनीं आपली भेट होत आहे. बारा वर्षांनंतर होणाऱ्या भेटी देवतांच्या सन्निद्ध व्हाव्या असं शास्त्र आहे. म्हणून हें यज्ञोपवीत हातांत धरून मीं पुढें आलों. ह्यांत गायत्री आणि सूर्य ह्या देवता आहेत.

**राणुबाई**—रामभरताच्या भेटीशिवाय ह्या भेटीला दुसरी उपमा काय द्यावी!

**गंगाधर**—पूर्वीं—आई, तूं शोक करीत होतीस तेव्हां मी बोललों होतों तें आज प्रत्ययाला आलं!

**राणुबाई**—देवाची मर्जी असल्यावर काय होणार नाहीं? बरं नारायणा, तूं इथून गेल्यापासून काय केलंस?

**गंगाधर**—आई, प्रथम एका पंक्तीला जेवण करून नंतर तें सर्व आपण शांतपणें ऐकून घेऊं!

(पडद्यांत उद्धव म्हणतो.)

**श्लोक.**

**सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं ॥**
**मिळेना कदा कल्पनाचेनि मेळीं ॥**
**ऋणी देव तो भक्तिभावें जयाचा ॥**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ. (सर्व जातात.)

**अंक दुसरा समाप्त.**

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

( सातारगडावरील अंबराईंत शिवाजी खिन्न होऊन येतो. )

**शिवाजी**—बस्स्! काय वाटेल तें होवो! समर्थांचं दर्शन झाल्याशिवाय अन्न म्हणून घ्यायचं नाहीं. पवित्र होऊन, व्याघ्रासनावर स्मरण करून भवानीमातेपुढें निजलों असतां, स्वप्नांत दर्शन देऊन स्फटिकाची माळ आणि नारळ प्रसाद दिला. मग असं कां? प्रत्यक्ष दर्शन कां देत नाहींत? ह्या महाराष्ट्रांतल्या सर्व साधूसंतांच्या भेटी होतात आणि ह्यांचीच कां होत नाहीं? रामेश्वराच्या पलीकडे लंका आणि हिमालयाची धवल कीर्ती जगाला अक्षयीं दाखविणारीं शुभ्र शिखरं, यांमधला जमिनीचा सर्व पट्टा ज्यांनीं तीर्थयात्रेच्या मिषानं बारकाईनं बघून, चहूंकडे रामचंद्र आणि हनुमान यांच्या उपासना सुरू केल्या आणि ज्यांनीं धर्माच्या जागृतीला उत्साह देण्याकरतां आजपर्यंत पांचशांपेक्षां अधिक रामदासी मठ स्थापन केले, अशा त्या सद्गुरुसमर्थांनीं मला दर्शन देऊं नये—इतका मी पातकी आहे काय? ‘शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगीं घाली त्यांसीं’ असं सांगून, श्रीतुकाराम महाराजांनीं आपल्यापासून मला लोटलं! आणि समर्थांनीं तर हें माझं तोंडच जागृतावस्थेंत बघायचं नाहीं—असा विचार केला आहेसं दिसतं! माझ्या राज्यांतले साधु—ज्या अर्थीं मला आपल्यापासून दूर लोटतात त्या अर्थीं मी खचित् पातकी—अधम आहें यांत संशय नाहीं. तेव्हां माझ्या सारख्याच्या हातून गोब्राह्मणांची सेवा करण्याकरतां स्वराज्य कसलं स्थापलं जाणार? म्हणून आतां पुरे झाला

हा व्याप! आतां, श्रीतुकाराम महाराजांनीं सांगितल्याप्रमाणें ब्रह्माची ओळख करून घेण्याकरतां, प्रथम तीर्थयात्रांनीं शरीर पुनीत करून नंतर गिरिकंदरीं वास करावा हेंच उत्तम. हा पोषाख, हे अलंकार, ही तलवार हें त्या ब्रह्मप्राप्तीपुढें काय आहे? मला ह्या वस्तू कशाला हव्या? (सर्व फेंकून देतो.) वाहव्वा, ही इथेंच संसाराची बिडी तुटली. आतां:-( पडद्यांत उद्धव म्हणतो. )

**श्लोक.**

न जाये जपाशी न जाये तपाशी ॥
न जायेचि काशी न जाये गयेशी ॥
गुरू-चिंतनावीण कोठें न जाये ॥
त्रिकाळीं सदा पाय त्याचेचि ध्याये ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ.

अँ, हें काय बरं! हा श्लोक ऐकून, मी आतांपर्यंत भ्रमिष्ट होतों असं आतां वाटायला लागलं! पण नाहीं. वाटतं कसलं खराच मी तसा आहें. कारण, अमावास्या आणि पौर्णिमा ह्या दोन तिथींवर समुद्राप्रमाणें, वेड्यांच्या शरीरांतलं रक्त चंद्राकर्षणानं जसं उधाण पावूं लागून, ते आनंदानं किंकाळ्या मारूं लागतात, त्याचप्रमाणें आतांचे हे शब्द ऐकून माझी स्थिति झाली आहे! माझ्या हृदयांत हास्यरसाला भरती येऊन तो मुखावाटे वाहूं लागणार असं वाटत असल्याकारणानं मी त्याला दाबीत आहें. तेव्हां मी वेडा कसा नव्हे? त्या वेड्यांत आणि माझ्यांत, मी वेडा आहें असं मला समजतं आहे—इतकंच काय तें अंतर—बाकी ते आणि मी एकच.(पडद्यांत उद्धव म्हणतो.)

**श्लोक.**

मनीहूनिया टाकिला सर्व हेवा ॥
सदां सर्वदां आदरी नीच सेवा ॥

गुरूचे गृहीं झाडितो सारवीतो ॥
जगीं तो गमे भूतळींचा रवी तो ॥ २ ॥

जयजय रघुवीर समर्थ.

( उद्धव-स्वामी, दोघां शिष्यांसह येतात. शिवाजी त्यांस वंदन करतो. )

**उद्धव**–छत्रपती भव. शिवाजी राजे, तुमच्या हातून स्वराज्य आणि स्वधर्म-स्थापना होऊन, गोब्राह्मणांचा प्रतिपाल व्हावा अशी श्रीची इच्छा असल्यामुळेंच तुमच्या हातून स्वराज्य-स्थापनेच्या खटपटी होत आहेत; परंतु अद्याप तुम्हांला गुरूची आवश्यकता आहे. श्रीसमर्थ रामदास म्हणजे प्रत्यक्ष मारुतीचे अवतार. त्यांचेही जन्म जगदुद्धाराकरतांच झाले आहेत. सर्वगामी हवेप्रमाणें सर्वत्र संचार करून, ज्यांनीं सद्यःस्थितीच्या दर्शनानं, स्वधर्म स्थापनेसाठीं, अभेद्य असं आपलं मत सुदृढ करून, नंतर आतां तुम्हांला स्वराज्य आणि स्वधर्मसंस्थापनेच्या कामीं मदत करण्याचं योजलं आहे असे जे आमचे सर्वश्रेष्ठ समर्थ रामदास, त्यांनीं तुमचा कट्टा भाव जाणून, हें तुम्हांला पत्र दिलं आहे. याचा तुम्हीं आशीर्वादासह स्वीकार करावा.

**शिवाजी**–( पत्र घेऊन तें मस्तकावर धरून ) असो. स्वप्नांतल्यापेक्षां ह्या पत्रदर्शनानं भेटीच्या दुसऱ्या पायरीवर चढायला सांपडलं. आतां ह्या पत्राच्या वाचनानं–ह्या अन्य मार्गानं समर्थांशीं बोलण्याचा प्रसंग मला पाप्याला आला ह्यांतच कौतुक वाटतं. ( वाचतो. )

**पत्र.**

निश्चयाचा महा मेरू । बहुत जनांसी आधारू ।
अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥ १ ॥
परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयाशीं ॥
जयाचे गुण महत्वाशी । तुलना कैची ॥ २ ॥
नरपति, हयपति । गजपति, गडपति ॥
पुरंदर आणि शक्ति । पृष्ठभागीं ॥ ३ ॥

**तीर्थक्षेत्रें तीं मोडलीं । ब्राह्मणस्थानें बिघडलीं ॥**
**सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ४ ॥**

**शिवाजी**–म्हणूनच, समोरून वर येणारा हा बालरवि असा लाल दिसतो आहे ! ह्याचमुळें ह्या वृक्षपल्लवी लोध्र–पांडुर अशा प्रकाशांत लीन झालेल्या दिसत आहेत. ज्या सनातन आर्यधर्माचा वेदघोष ज्या देवळांतून ऐकूं यायचा–तिथें कुराणांच्या वाचनानं दशशिशा घुमून राहून, त्याचे प्रतिध्वनी, आर्यांच्या वक्षस्थलांवर उठावे काय ! पण हे प्रतिध्वनि फार निराळे आहेत बरं ! हे आम्हांला जागे करताहेत. ह्याच अवस्थेंत हा पत्ररूप प्रतिध्वनि जो आतां माझ्या तोंडून निघाला, तो ह्या देहाच्या श्वासनलिकेंत, सर्व स्नायूंमधून फिरून–नंतर घुसला असल्यामुळें, गिरिकंदरांत उठलेला सिंहगर्जनेचा प्रतिध्वनि, जसा हत्तींनां भेडावतो, त्याप्रमाणें, माझ्यासारख्याकडून ह्या देशाच्या आणि आर्यधर्माच्या शत्रूंची रग जिरवण्याकरतांच समर्थांची ही पत्ररूप शक्ति आतां सज्ज झाली आहे. गुलामानों, आतां सावध रहा. बरं असो–पुढें काय ? ( वाचतो. )

**देवधर्म गोब्राह्मण । करावयाशीं रक्षण ॥**
**हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥ ५ ॥**
**या भूमंडळाचे ठायीं । धर्मरक्षी ऐसा नाहीं**
**महाराष्ट्र धर्म राहिला कांहीं । तुम्हां करितां ॥ ६ ॥**
**आणखी कांहीं धर्म चालती । श्रीमंत होऊनी कितेक असती ॥**
**धन्य धन्य तुमची कीर्ति । विश्वीं विस्तारली ॥ ७ ॥**

**शिवाजी**–ह्या देशाचे खरे मालक आम्हीं आर्यवीर–ह्या महाराष्ट्र–भूमीचे बच्चे जिवंत असतां, ह्या स्थलीं आमच्या आर्यधर्माची पायमल्ली करणारे दुसरे धर्म वरचढ होऊन, त्या धर्मीयांच्या थुंकझेलींनं श्रीमंत होऊन सुखविलासांत गर्क होणारे

बरेच कमअस्सल सध्यां विहार करीत आहेत. त्यांचा समाचार घेतलाच पाहिजे. बरं पुढें काय लिहिलं आहे? (वाचतो.)

**तुमचे देशीं वास्तव्य केलें। परंतु वर्तमान नाहीं घेतलें ॥**
**ऋणानुबंधें विस्मरण झालें। बा काय नेणु ॥ ७ ॥**

**शिवाजी**—महाराज, काय हें माझं प्रालब्ध! शेवटीं मलाच दोष यावाना? (वाचतो.)

**उदंड राजकारण तटलें। तेथें चित्त विभागलें ॥**
**प्रसंग नसतां लिहिलें। क्षमा केली पाहिजे ॥ ८ ॥**

**शिवाजी**—महाराज, सर्वस्वीं मला अपराधी ठरवून, शेवटीं आपणच माझ्यासारख्या मूर्खापाशीं क्षमा मागायची हा न्याय कुठला?

**उद्धव**—राजा, समर्थांच्याकडे जाण्याची आम्हांला तातडी आहे. आम्हीं येतो आतां! तुझं कल्याण असो.

**शिवाजी**—ह्या देशांत साधुवृंद पुष्कळ आहेत. त्या सर्वांचं दर्शन घेऊन यथाशक्ति सेवा आणि भाषण करीत आहें; परंतु आजपर्यंत समर्थांची भेट झाली नाहीं आणि त्यांचा समाचारही घेणं घडलं नाहीं. तेव्हां मी केवढा अभागी आहें? असो. महाराज, समर्थांना देण्याकरतां मी एक पत्र लिहून देतों, तें आपण घेऊन जाण्याची कृपा करावी. मी त्यांचा अत्यंत अपराधी आहें. ते क्षमावंत आहेतच. त्यांनीं कृपाकरून हें आशीर्वादपत्र माझ्यासारख्या अभाग्याला धाडून, माझ्यावर अमृतवृष्टीच केली आहे. हें पत्र पाहून मला परमानंद झाला आहे. आतां साक्षात् दर्शन घडावं एवढीच इच्छा आहे.

**उद्धव**— **श्लोक.**

**जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ॥**
**कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी ॥**
**प्रभू दक्ष व्युत्पन्न चातुर्य जाणें।**
**तयाचेनि योगें समाधान बाणें ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ. (सर्व जातात.)

## प्रवेश दुसरा.

( उंबराच्या झाडाखालीं **रामदास** आसनमांडी घालून काखेंत कुबडी घेतलेले व पुढें दासबोध आहे असे दृष्टीस पडतात. )

**रामदास**–अहाहा, काय ही ह्या वनश्रीची शोभा आहे! परमेश्वराच्या गुप्त हातांनीं पेरल्या गेलेल्या बियाण्यापासून, स्वातंत्र्यांत जन्म पावलेले हे वृक्ष आपल्या पोषणाचा हवाला परमेश्वरावर टाकून, झंजावातासारख्या शत्रूशीं झुंजून, आपल्या फलपुष्पांनीं ज्याप्रमाणें जगावर उपकार करीत आहेत, त्याचप्रमाणें, परमेश्वराच्या अत्युच्य कुशलतेनं निर्माण झालेले जे आम्हीं मानवी प्राणी, त्या आम्हीं आपल्या उदारकृत्यांनीं उदात्त तत्वांचं मराठी साम्राज्य स्थापन करून–जगावर भूतदया दाखविण्याचा प्रयत्न करूं नये काय? ही सर्व भरतभूमी कानाकोंपऱ्यांसुद्धां अवलोकन केली; परंतु सर्वत्र स्वधर्माला हद्दपार केलेलंच निदर्शनाला आलं. चहूंकडे, पारतंत्र्यांतच निमग्न झालेला राक्षसी प्रकार दृष्टीस पडला. जन्माबरोबर स्वातंत्र्य आणि मरण ह्या ज्या परमेश्वरनिर्मित दोन सनदा–प्राणीमात्र बरोबर घेऊन येतो त्या--आमच्या–ह्या यवनांनीं छिनवून घेतल्यामुळें, त्या परत मिळवण्याची खटपट करायला त्यांना उद्युक्त करण्याकरतां, त्यांचा स्वधर्म काय आहे तो त्यांनां कळावा म्हणून जागोजाग मठ स्थापून शिष्यसांप्रदाय सुरू केला आणि येईल त्याला मग तो-हिंदु असो अगर मुसलमान असो-रामदास करून सोडला. रडत असलेलं मूल, त्याची आई दळीत बसली असतां तिच्या मांडीवर डोकं टेकून दळणाच्या प्रेमळ घरघरींत जसं गाढ सुखाची झोंप घेतं त्याच प्रमाणें स्वातंत्र्य ह्या शब्दोच्चारांत प्रेम आहे; परंतु ती गोडी, बालपणापासूनच ज्यांनां घरांत आणि शाळेंत गुलामगिरीच्या धड्यांचं शिक्षण मिळवण्याची संवय

झाली त्यांनां स्वातंत्र्यामृताच्या गुटक्याचा काय अनुभव असणार ! ( पडद्यांत )

श्लोक.

नव्हे तेंचि झालें नसें तेंचि आलें ॥
कळों लागलें सज्जनाचेनि बोलें ॥
अनिर्वाच्य तें वाच्य वाचे वदावें ॥
मना संत आनंत शोधीत जावें ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ.

( कल्याण पुढें येऊन नमस्कार करतो. )

**रामदास**—कल्याण !

**कल्याण**—राजे शिवाजी यांच्याकडून हें पत्रोत्तर आलं आहे.

**रामदास**—वाचा पाहूं ?

**कल्याण**—( पत्र वाचतो. )

अभंग.

सद्गुरु बापा तूं माहेरा ॥ मातें तुझाचि उबारा ॥
पार कीजे भवसागरा ॥ पूर्ण दारा स्वामीया ॥ १ ॥
अनन्याच्या प्रतिपाळका ॥ दारुण भवभयहारका ॥
रक्षा आपुल्या बालका ॥ नका नका उपेक्षूं ॥ २ ॥
भवसर्पें गुंडाळिलें ॥ तेणें मन हें व्याकुळ झालें ॥
हित अहित विसरलें ॥ सांभाळिलें पाहिजे ॥ ३ ॥
मोकलिलें तुम्ही जरी ॥ निरवावें त्यां कवणें परी ॥
तुम्हांविण गति दुसरी ॥ मातें नाहीं दयाळा ॥ ४ ॥
शुद्ध करोनियां मन ॥ पूर्ण निजरूप जाणून ॥
रामदासीं लोटांगण ॥ शिवराजानें घातलें ॥ ५ ॥

**रामदास**—काय, शिवबांची मरजी दर्शन घेण्याची आहे काय ?

**कल्याण**—ते पहा, पुढें सेवेकरी दिवाकर भट्ट आणि मागून परिवारासह शिवाजी राजे येताहेत. ( दिवाकर येतो. )

**दिवाकर**—महाराजांच्या दर्शनाला शिवाजी राजे आले आहेत. त्यांना मी घेऊन आलों आहें. ( नमस्कार घालून उठतो इतक्यांत, **शिवाजी, बाळाजी आवजी चिटणीस, निळो सोनदेव मुजूमदार** वगैरे सर्व येऊन पायां पडतात व उठून हात जोडून उभे राहतात. )

**रामदास**—शिवाजी राजे, पत्र आणि तुम्ही, लागोपाठ येण्याजी घाई कां केलीत ? तुमच्या देशांत आम्हीं आहोंत ! आमचा परामर्ष तुम्हीं बराच घेतलांत ?

**शिवाजी**—महाराज, मीं सर्वस्वी अपराधी आहें. समर्थ क्षमाशील आहेत. दासाला क्षमा करून कृपानुग्रह करावा. आजपर्यंत प्रत्यक्ष दर्शनाची इच्छा होती. ती आज पूर्ण झाली. आतां दुसरी आहे ती समर्थांनीं पूर्ण करावी.

**रामदास**—मंदवारीं रात्रीं प्रतापगडीं जें सांगायचं तें सांगून माळ व नारळ प्रसाद द्यायचा तो देऊन आलों. आतां त्या व्यतिरिक्त काय इच्छा आहे ?

**शिवाजी**—आज्ञा झाली ती प्रमाण ? परंतु समर्थांनीं कृपापूर्वक अनुग्रह प्रसाद देऊन पावन करावं ही इच्छा आहे. ती पूर्ण करावी. बराच काळ आई न भेटल्यामुळें मूल जसं रडून रडून दमतं आणि त्याच वेळीं आईचं दर्शन झालं कीं, अमृतवत् स्तनपान करीत असतांच तें सौख्यानं निद्रावश होतं, त्याप्रमाणें समर्थांच्या भेटीसाठीं, तळमळणाऱ्या ह्या शिवाजीला समर्थांचं दर्शन झालं आहे. आतां कृपानुग्रहाच्या सौख्यांत रममाण व्हावं ही इच्छा आहे. मुलाचे चोज आईशिवाय कोण पुरवणार ? स्वामी समर्थ आहेत.

**रामदास**—कल्याणा, शिवाजी राजे काय म्हणतात ?

**कल्याण**—हे सत्पात्र खरे ! आणि मूळचाही संकल्प असाच आहे. हें जाणून समर्थांनीं कृपा करावी !

**रामदास**—बहुत बरं! श्रीची इच्छा आहे तसं करावं!

**कल्याण**—स्वामींची इच्छा आपल्या मनोदयाप्रमाणें झाली आहे. तरी पूजासामुग्री आणवावी. नसल्यास आरण्यांतलीं फुलं आणून सामुग्री करतों.

**शिवाजी**—सर्व साहित्य सिद्ध आहे. आतांच आणवितों. चिटणीस, मुजूमदार, सामुग्री घेऊन यावी!

( दोघे जातात. )

**रामदास**—आम्हीं स्नान करून येतों. (कल्याणासह जातात.)

**शिवाजी**—ज्याप्रमाणें आठ महिनेपर्यंत रोज सूर्यनारायण ह्या पृथ्वीतले रस शोषून, पावसाळ्यांत, मेघडंबरामार्फत, सहस्रपट जास्त व शुद्ध असे परत करतो, त्याप्रमाणें समर्थांच्या दर्शनाच्या लालसेनं शोषण केलेले ह्या शरीरांतले रस समर्थदर्शनाकडून परत मिळाल्यामुळें, हा देह, ह्यांतल्या मनासह सौख्याच्या रमणीय मंदिरांत वर्षाऋतूंतल्या चातकाच्या आनंदाप्रमाणें सौख्यांत निमग्न झाला आहे. ( चिटणीस व मुजूमदार येतात. ) काय, आणली सामुग्री?

**दोघे**—होय सरकार! ( रामदास येतात—त्यांस सर्व नमस्कार घालून हात जोडून उभे राहतात. )

**रामदास**—कल्याणा, शिवाजी राजांना पूजाविधि सांग.

( शिवाजी पूजा करतो व त्यास रामदास मंत्र देतात. )

**शिवाजी**—काशी—रामेश्वरादि पवित्र स्थानांची यात्रा पूर्ण झाली असतां, आल्या जन्माचं सार्थक झालं असं मानतात; परंतु माझ्या जन्माचं सार्थक ह्या अनुग्रह—प्रसादानंच झालं असं मला वाटतं. आतां परमार्थाविषयीं दोन शब्द ऐकावे अशी इच्छा आहे. ती स्वामी—समर्थ पूर्ण करणारे आहेत.

**रामदास**—राजा, प्रत्येकाला आत्मानात्म विचार कळलाच

पाहिजे. म्हणजेच ऐक्यामृताचं पान करण्याला व करवण्याला प्रत्येक माणूस तयार होतो. तें काय आहे तें ऐका :—

## आत्मानात्म विचार.

ज्यानां पंचतत्वं म्हणतात त्यांची स्वरूपं स्वानुभवानंच जाणलीं पाहिजेत. त्यांत शाश्वत कोण आणि अशाश्वत कोण ह्याचं विवरण केलं पाहिजे. पृथ्वी, आप, तेज, वायु, आणि आकाश हीं पंचतत्वं होत. पृथ्वी नेहमीं रचली जाऊन खचते. त्याची साक्ष ह्या सृष्टीरचनेवरून नेहमीं येते. त्याचप्रमाणें पाणी आटतं. तेजही प्रकाशून नाहींसं होतं. वायूही नष्ट होतो. बाकी राहिलं जें आकाश तें तर नाम-धारी--आभासरूप. तेव्हां तेंही नाहींच म्हटलं तरी चालेल. आकाश हें चारी तत्वांचं जननस्थान असं मानलं जात असतां, त्या जननस्थानाचाच जर नुसता आभास, तर बाकींचीही तशींच म्हटलीं पाहिजेत. ह्यावरून जें दिसतं तें नाशवंत असून अशा-श्वत आणि सर्वांभूतीं वस्ति करणारा व अदृश्य असा जो आत्मा तोच फक्त शाश्वत जाणावा. त्याचं स्वरूप कळण्याला ज्ञान पाहिजे. त्या ज्ञानभांडाराची किल्ली संतजनांशिवाय मिळणं नाहीं. म्हणून त्यांस शरण जावं. आत्म्याला जन्म आणि मृत्यु नसून तो अक्षय आहे. निराकारांत आकार आणि आकारांत निराकार असा भास होतो; परंतु तें सर्व विवेकज्ञानानं ओळखावं लागतं. त्यालाच नित्यानित्य विवेक असं म्हणतात. आसाराच्या ठिकाणीं सार व साराच्या ठिकाणीं आसार भासतो तोच सारासार विचार करून शोधून पहावा. पंचभूतांपासून झालेलं सर्व मायीक व अनेक दिसून अनित्य असतं. आत्मा एकच असून तो नित्य आहे. गगन हें जरी सघन दिसतं तरी वस्तु आणि गगन ह्यांत भिन्नता नाहीं. उपाधी आहे म्हणून आकाश आहे. उपाधीच नसेल

तर सर्वच निराभास. निराभासाप्रमाणेंच गगन हें अविनाशी आहे. जें पाहूं गेलं असतां सांपडत नाहीं तेंच अक्षय होय. परमात्मा म्हणून जो कोणी आहे तो निराकार आहे. मग आपण कोण? ह्या देहाला वायू सोडून गेला कीं, ह्याचा अंत होतो. ह्याचं प्रत्यक्षप्रमाण श्वासोच्छ्वासाचीं इंद्रियं दाबून धरलीं असतां तत्काळ येतो. देह, वायू वेगळा झाला कीं, त्याला मढं म्हणतात. मढ्याच्या हातून काय कर्तृत्व घडणार? देह असेल तर वायूचा उपयोग आणि वायू असेल तर देहाचा उपयोग. प्रत्येक स्वतंत्रपणें कांहींच करूं शकत नाहीं. तेव्हां वायूचा कर्ता जो कोणी तोच आत्माराम आणि त्याचा सेवक वायू. ह्याच अन्वयें रामचंद्र आणि त्याचा सेवक हनुमान हे जाणावे. आपण कर्ते असं जर म्हटलं तर वास्तवीक आपल्या इच्छेनुसार घडलं पाहिजे. पण तें जर घडत नाहीं तर कर्ता आपण नसून भोग तरी कोण आहे? ज्याप्रमाणें प्रकाश आणि अंधःकार, विचार आणि अविचार, विकार आणि अविकार यांतलं अंतर विवेकाशिवाय कळत नाहीं त्याचप्रमाणें जन्मांधाला रत्नाची पारख होणार नसून, प्रत्यय म्हणजे न्याय आणि अप्रत्यय म्हणजे अन्याय हेंही अप्रबुद्धाला कळणार नाहीं. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून, निर्गुण निराकार जो आत्माराम त्याच्याशीं वायूच्या मदतीनं जो जाऊन अनन्य होतो तोच ज्ञाता धन्य होऊन आत्मनिवेदनांत परम मान्य असा पुरुष होतो. ( शिवाजीच्या डोक्यावर हात ठेवून ) बाप्पा, धन्य आहेस तूं! तुझ्या सध्यांच्या आत्मसमाधीवरून, तूं अनुभवसुखाला पावलास असं दिसतं. ह्यालाच आत्मसुख म्हणावं.

**शिवाजी**–मज अनाथाला स्वामींनीं आज सनाथ केलं.

**रामदास**–शिवबा, स्वानुभवाचं लक्षण ऐका:—

**अभंग.**

**स्वानुभवाचे पालवी । शुद्ध गाळिले आघवी ॥**
**सघनीं हरपलें गगन । सहज गगन तें सघन ॥**
**सदा शुद्ध स्वप्रकाश । अवकाशाविणें आकाश ॥**
**रामी रामदास म्हणे । अनुभवाची ही खूण ॥ १ ॥**

**शिवाजी**–आतां ह्या उप्पर कांहीं इच्छा नाहीं. सदोदित अशीच कृपादृष्टी असावी. ( नमस्कार घालतो. )

**रामदास**–शिवबा, कृपादृष्टी कोण ठेवणार! तुमच्यावर श्रीचीच कृपादृष्टी आहे. कल्याणा, प्रसाद आण! ( कल्याण प्रसाद आणतो. त्यापैकीं, मूठभर माती, दोन मुठी लीद व चार मुठी खडे रामदास शिवाजीच्या पदरीं घालतात. शिवाजी प्रदक्षिणा घालून नमस्कार करून उभा राहतो. )

**शिवाजी**–मी आत्मसुखातें पावलों. हीच स्थिति निरंतर असावी. हल्लीं राज्याचा व्यवहार चालविला आहे हा पुरेसा वाटत असतां–समर्थांच्या कडून हा त्याच मार्गाचा प्रसाद मिळाला. तेव्हां आतां बिचकल्या सारखं होत आहे. खरी इच्छा समर्थांच्या इतर शिष्यांप्रमाणें सेवा करून अक्षय संनिध असावं अशी आहे.

**रामदास**–इच्छेप्रमाणेंच आहे. प्रत्येकाच्या आत्म्यासंनिध जें हवं तें आहे; मग तुमच्या जवळ आम्हीं आणि आमच्याजवळ तुम्हीं नाहीं असं कसं होईल? आमच्या इतर शिष्यांकडून तुमच्या कामगिरींतला स्वधर्मजागृतीचा अर्धा भाग उरकून तुमच्याकडू क्षात्रधर्माचा जो अर्धा भाग तो उरकायचा आहे. तुमचा तोच मुख्य धर्म असून तुम्हीं प्रजेचं पालन करावं. देव ब्राह्मणांची सेवा करावी. तुमच्या हातून अद्याप अमानुषीय कर्मं पुष्कळ व्हायचीं आहेत. पृथ्वी फार दिवस यवनमय

झाली आहे. त्याचं निवारण तुमच्या हातून करून, ।। बहुतां दिवसांचें हें बंड ।। म्लेंच्छ माजले उदंड ।। यांचे करूनि दुखंड ।। राज्यकरावें ।। अशी श्रीच्चि इच्छा आहे. म्हणून तो क्षात्र-धर्मच तुम्हांला योग्य आहे. श्रीकृष्ण परमात्म्यांनीं भारती युद्धांत भीष्मपर्वाच्या प्रारंभीं अर्जुनाला जो उपदेश केला आहे त्यालाच गीता असं म्हणतात. तें सर्व तुम्हांला माहीतच आहे. श्रीनीं तुम्हांला म्लेंच्छनिवारणार्थ उत्पन्न केलं आहे अशी आम्हांला पंचवटींत आज्ञा झाली आहे. तुम्हीं वर्णाश्रमधर्में-करून श्रीच्या आज्ञेप्रमाणें राज्य आणि धर्मस्थापना करावी. त्यांतच तुमचा परमार्थ आहे. पूर्वीं राजे होऊन गेले—त्यांच्या कृती तुम्हीं रोज पुराणांतरीं श्रवण करीतच आहांत. तुमचे पूर्वज कोणच्या वंशांतले होते हें लक्षांत आणा. तुमचे पूर्वज शिसोदेसिंह, पृथ्वीपालसिंह, लक्ष्मणसिंह—त्यांच्याच तोडीचे तुम्हीं शिवसिंह असल्याकारणानं त्यांच्या प्रतापाप्रमाणें, क्षात्र आणि राजधर्माचा प्रताप तुम्हीं केला पाहिजे. तो टाकून भल-तीच इच्छा तुम्हीं धरूं नये.

**शिवाजी**—आज्ञा शिरसा वंद्य आहे. राजधर्माचा बोध व्हावा ही इच्छा आहे.

**रामदास**—थोडक्यांत सांगतों ऐका:—

## राजधर्म.

राज्य हा एक प्रपंच आहे. प्रपंचांत सावधपणा ठेवला असतां, सुखप्राप्ति होते. मोठा कार्यभाग साधण्याकरतां दीर्घ प्रयत्न केले पाहिजेत. कोणताही कार्यभाग होण्याला कार्य-कर्त्यांचे गुण उपयोगी पडतात. म्हणून पाहून, समजून कोणचंही कार्य केलं असतां, उणेपणा येत नाहीं. महत्कार्य साधण्याच्या कामीं विघ्नं यायचींच; परंतु त्यांना न जुमानतां, कार्यभाग उरकून घेतला पाहिजे. यथातथ्य विचार करून जे

अमर्याद फ़ितवेखोर ठरतील त्यांचा वेलाशक संहार करावा. कोणच्या माणसाचा केव्हां उपयोग होतो ह्याचा नेम नाहीं. म्हणून नेहमीं माणसं राजी राखीत असावीं. ऐन प्रसंगीं एखादा माणूस सहज उपयोगी येतो. म्हणून न्याय न सोडतां त्याच्यासाठीं खस्त खावी. न्यायाची सीमा उल्लंघिली असतां, न्यायाबरोबर उपायही हद्दपार होतो. संकटांत कंटाळूं नये. उपाय करून पार पडावं. ज्या योगानं चतुर लोक तोंडांत बोट घालतील असे नीट नेटके बंद बांधावे, म्हणजे कारभार उत्तम होतो. प्रत्येक राजकारणांत आपणच धुरीण होण्यापेक्षां अनेक धुरी करून अनेक राजकारणं शेवटास न्यावीं. अनेक प्रकारचीं अनेक डोकीं आश्रयाला ठेवून, त्यांच्याकडून सावधपणानं वेगवेगळालीं कामं करून घ्यावीं. मोहोरा अभिमानाला पेटला असतां, तो आपल्या जीवाकडे बघत नाहीं, मोठालीं कामं सहज करतो. म्हणून अनेक मोहोरे तयार करून नेहमीं चपेटे करावे. वाघाच्या चपेट्याला भिऊन मेंढरं जशीं बारा वाटा पळतात त्याचप्रमाणें आपल्या देशाचे आणि धर्माचे शत्रू पिटाळून लावणारे मोहोरे तयार करून चपेटे करावे. मस्त रेड्याप्रमाणें फुका भोजनभाऊ जवळून हकून द्यावे. रायानीं राजधर्म करून, क्षत्रियांनीं क्षात्रधर्म करावा आणि ब्राह्मणांनीं नानाप्रकारें स्वधर्म करून क्षत्रियांना मदत करावी. तुरुंग, शस्त्र आणि सैनिक यांची प्रथम व्यवस्था करावी. त्यांच्या भयानं थोर थोर शत्रू पळून जातात. आपले सेवक आपल्या आज्ञेत राहतील अशी आपली वर्तणूक ठेवावी. ह्या राजधर्मापेक्षां क्षात्रधर्म फार बिकट आणि अत्यंत दुर्लभ आहे!

## क्षात्रधर्म.

ज्याला स्वतःच्या जिवाची भीति वाटत असेल त्यानं क्षात्रधर्माचं अवलंबन न करतां वाटेल तें करून पोट भरावं. समरांगणांत

विन्मुख मेलं असतां नरकप्राप्ति होते. शत्रूला पाठ दाखवून रणांतून पळून आलं असतां, इहलोकची कीर्ति, आणि स्वर्गसौख्य अशा दुहेरी सुखाला मुकावं लागतं. मारतां मारतां मरून गतीला जावं किंवा विजयी होऊन महद्भाग्य भोगावं. ज्या योगानं रणशूरांचीं अंतःकरणं सुप्रसन्न होतात असे नजर करार राखून, कार्य पाहून खतल करावं. ज्या प्रमाणें भाड्यांचा गलोला, भारांत निर्भय पडून राहतो, त्याप्रमाणें क्षत्रिय परसैन्यांत रिचवला गेला पाहिजे. अशा वेळीं रणभेरींच्या गडगडाटांत बळंच घालून घेतल्या प्रमाणं—उसन्या घाईनं आणि निधड्या छातीनं शत्रूच्या छातींत भाला रोंवला पाहिजे. म्हणजे सहज निःशंकपणें भार फुटतात आणि शत्रूचे तबकें तुटतात. अशा शौर्यानं सर्व वीर एकमद उठले असतां, शत्रूच्या पराक्रमाची काळजी राहात नाहीं. चित्ता जसा हरणं लोळवतो तसे शत्रू रणांत धूळ फाकीत पडतात. मर्दांनीं तकवा धरला म्हणजे जयश्री खात्रीनं माळ घालते. लोक राजी राखून दबून युद्ध करावं म्हणजे तें युद्ध खबरदारीचं होतं. विघ्नांना न जुमानतां उपायांनीं, पार होऊन जावं. नेहमीं कार्य—प्रसंग ओळखून डाव केला पाहिजे. लढाई हातघाईवर आली असतां, मिश्र शस्त्रांच्या लखलखाटांत, बेहद्द युद्ध करावं. देवांचा उच्छेद, गाईचे वध आणि ब्राह्मणांचा छल झालेला ऐकून स्वस्थ बसणाऱ्याला—बाटगा, प्रेतवत् मानून—तोडून टाकावा. महाराष्ट्रांत राहणारे तितके सर्व मराठे आणि मराठ्यांच्या कृतींचं अनुकरण करण्याला सज्ज होणारे ते सर्व महाराष्ट्राचे अवयवभूत मराठे समजून, त्यांनां क्षत्रियांत घालावे आणि बंधुप्रेमानं—ऐक्यभावानं—संधानं—महाराष्ट्रधर्म वाढवावा. असं जर केलं नाहीं तर पूर्वजांकडून धिक्कारांचे जे उष्ण श्वास

ह्या भूमीवर येतील, त्यांनीं हीं तोंडं करपलीं जातील.—ही भीती प्रत्येक महाराष्ट्रीयानं बाळगली पाहिजे. जो जन्माला आला तो मरणाची सनद बरोबरच घेऊन येतो. म्हणून जन्मल्यानंतर कार्य-कर्तृत्वाच्या काळीं प्रत्येक गोष्ट विचारानं करावी. जे स्वतःला कुलवंत म्हणवीत असतील त्या सर्वांनीं ह्या प्रसंगीं स्वराज्य आणि स्वधर्मस्थापनेसाठीं—आर्यानं आर्यभूमीचं शत्रूपासून रक्षण करण्याच्या स्वाभाविक हक्काला मान देऊन—हातांत शस्त्र धरून पुढें सरसवावं. नाहींतर झाले ह्यापेक्षां अधिक हाल ह्यापुढें भोगावे लागणार आहेत. जे देवद्रोही असतील त्यांना कुत-रडीं—समजून, जागच्याजागीं उभे चिरावे. तुळजावराच्या कृपेनं रामानं रावण मारला. म्हणून त्याचप्रमाणें सावधपणानं, विवेक—विचार करून त्याच 'हरहर महादेवाला' मस्तकीं धरून हलकल्होळ करावा! श्रीतुळजाभवानी रामचंद्राची वर-दायिनी आहे. प्रत्येक वीरानं आपल्या देहांतलं रक्त तिच्या तीर्थानं वीररसाश्रित करून, स्वधर्म हेंच आपलं कार्य आहे असं म्हणून, ऐक्यानं शत्रूवर तुटून पडावं—त्यांचा धोशा उडवून द्यावा आणि विजयी होऊन भाग्य भोगावं. अशी त्या शक्तीची तीव्रता असल्यामुळेंच रामचंद्राचे आम्हीं दास तिची रोज आरा-धना करतों. असो. शिवबा, अशा तऱ्हेच्या राज आणि क्षात्र-धर्मानं जो राज्य करतो तोच धर्मराजाची योग्यता पावतो.

**शिवाजी**—तथास्तु. महाराज, सर्व लज्जा आपली आहे.

**रामदास**—तुमची सर्व लज्जा श्रीला आहे. काळजी कर-ण्याचं कारण नाहीं.

**शिवाजी**—आज्ञा प्रमाण.

**रामदास**—बाप्पा शिवबा, तुम्हीं श्रीचेच अंशभूत आहांत. तेव्हां तुमच्या धारणेची काय कीर्ति वर्णन करावी! ( डोक्यावर

हात ठेवून ) परंतु असो—यावच्चंद्रदिवाकरौ तुमच्या कीर्तीचा दुंदुभी त्रैलोक्यांत दुमदुमत राहून आपल्या पवित्र आचरणानं आणि नीतीच्या कारभारानं विदेही जनक राजाप्रमाणें इहलोक तरून अंतीं मुक्तीला जाल यांत शंका नाहीं.

**शिवाजी**—तथास्तु.

**बाळाजी आवजी**—संसाराच्या रथवाहकाला जर स्वामींनीं परम कृपारूप तीर्थानं पुनीत केलं, तर त्याबरोबर नळाही जरी पवित्र झाला आहे, तरी शास्त्रोक्त विधि झाल्यावांचून आपलं पूर्वसुकृत उदेलं झालं असं तो कसं मानील ?

**रामदास**—बाळाजी आवजी, तुम्हीं बोलण्यांत आपल्या कामाप्रमाणेंच मोठे चतुर आणि अलंकारिक आहांत हें शिवराजांस भूषणावह आहे.

**निळो सोनदेव**—ईशकृपानुग्रहाशिवाय प्राणीमात्र काय करणार ? कठीण प्रसंग येऊन अन्नदाता जर विपन्नावस्थेंत पडला, तर त्याला सेवकांनीं मदत करून प्रसंगांतून पार पाडणं, जसं न्यायाचं आहे त्याच प्रमाणें, अन्नदात्याला मदत करण्याचं सामर्थ्य सेवकाच्या अंगांत उत्पन्न करण्याचं काम खाल्या अन्नाचं आहे. खाल्लेलं अन्न ज्या किमतीचं असेल त्याच किमतीचा तें पराक्रम दाखवतं. त्यामध्यें ईश-कृपानुग्रहाची योग्य भर पडल्यावर सेवक आपल्या कामगिरींत फत्ते पावून धन्याकडून सर्वथैव शाबासकी मिळवण्याला पात्र होतो.

**शिवाजी**—ह्या माझ्या दोघां दोस्तांचं म्हणणं खरं आहे.

**कल्याण**—ह्या दोघांनां स्वामींनीं पुनीत करावं अशी त्यांच्या प्रमाणें शिवाजी राजांचीही इच्छा दिसते आहे. शिवाय ते सत्पात्रही आहेत.

**रामदास**—ठीक आहे. श्रीची मरजी.

( दोघे पूजा करून अनुग्रह-मंत्र घेतात. )

**दोघे**–ह्या देशाची, आर्यधर्माची, गोब्राह्मणांची आणि अन्नदात्याची सेवा करण्याला आतां योग्य झालेले हे देह–आमरण झिजवण्यासाठीं, श्रीसमर्थांच्या पायीं अर्पण केले आहेत. ( पायां पडतात. )

**रामदास**–बाळाजी आवजी आणि निळो सोनदेव, तुम्हां दोघांच्या स्त्रियांप्रमाणें जगन्माता–अशा–सती–पतिव्रता ह्या भूमंडळावर सध्यांच्या काळांत आपल्यांत उत्पन्न होऊं लागून आपल्या पतिव्रता–पत्नीरूप–शक्तीच्या–साह्यानं ह्या देशाच्या व धर्माच्या शत्रूचा मोड करण्यास आमरणांत झटून शिवराजांस मदत करण्याच्या ज्या तुम्हीं प्रतिज्ञा केल्या आहेत त्यांवरून म्लेंच्छनिर्दाळनाला आतां फारसा वेळ लागणार नाहीं असं सिद्ध होतं. तुम्हीं पत्करलेल्या मार्गानंच जाऊन, महाराष्ट्रधर्म वाढवण्याला शिवराजांस सेवाधर्मानं मदत करावी हेंच तुम्हांला योग्य आहे.

**दोघे**–आज्ञा प्रमाण.

**शिवाजी**–महाराष्ट्रधर्म म्हणून जो समर्थांनीं सांगितला त्यांत आणि वैदिक धर्मांत अंतर काय हें समर्थमुखावाटे, बाहेर पडलं असतां, तेंच गोमुखांतलं तीर्थ असं जाणून, अठरापगड जात त्याचं सेवन करील.

**रामदास**–शिवाजी राजे, वैदिक धर्म आणि महाराष्ट्रधर्म यांत फरक नसून–ज्या मध्यें सद्यःस्थितीचा अंतर्भाव होतो असा हा महाराष्ट्रधर्म आहे. ह्या धर्माची व्याख्या सद्यःकालाला अनुसरून आहे. हा धर्म वैदिक धर्मापेक्षां व्यापक आहे. महाराष्ट्रधर्म म्हणजे, आर्यधर्म+गोब्राह्मणप्रतिपाल+स्वराज्यस्थापना+संमेलन+नायकत्व=ह्या सर्वांचं एकीकरण. ही अशी ह्या महाराष्ट्रधर्माची व्याख्या आहे. ह्या सर्व गोष्टींस अनुसरून प्रत्येक महाराष्ट्रीयानं वागणं म्हणजेच महाराष्ट्रधर्मी होणं होय.

ह्यानंच स्वराज्य आणि स्वातंत्र्यप्राप्ति होणार आहे. सध्यां ॥ कितेक म्लेंच्छ होउनी गेले ॥ कितेक फिरंगणांत आटले ॥ देश भाषेनें रोधिले ॥ कितिएक ॥ महाराष्ट्र देश थोडा उरला ॥ राजकारणें लोक रोधला ॥ अवकाश नाहीं जेवायाला ॥ उदंड कामें ॥ अशी स्थिति झाली असल्यामुळें हाच कार्यभाग आधीं उरकला पाहिजे. म्हणून ॥ मराठा तितुका मेळवावा ॥ महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥ येविषीं करितां तकवा ॥ पूर्वज हासती ॥ चिटणीस, मुजूमदार, तुम्हीं आणि राजे शिवाजी जरी आज गुरुबंधु झालां आहांत, तरी शिवाजी राजे हे लोकनायक असून त्यांचे तुम्ही सेवक आहांत हें विसरतां कामां नये. कारण:—

## सेवाधर्म.

सेवा धर्म मोठा बिकट आहे. सेवकपणाचं मुख्य वर्म सेवकाच्या कृतींत कृत्रिमपणा असूं नये. कृत्रिमानं संभ्रम होत नाहीं. पदरीं दारिद्र्य असल्यामुळेंच सेवकत्व येतं. धन्याचं अन्न खाऊन वाढवलेला देह आणि त्याच स्थितींत अनुभवानं मिळवलेलं ज्ञान फक्त स्वहिताकरतां जर कोणी सेवक उपयोगी पाडील, तर पर्यायानं त्याचंच त्यांत नुकसान होतं. यजमानाचं मनोगत न राखतां जो आपलं बुद्धिवैभव पुढें करण्याची खटपट करतो त्याला पदभ्रष्ट व्हावं लागतं. यजमानापुढें गोड बोलून, मागें कुचेष्टा करणारे सेवक अधमाधम जाणावे. सेवकानं आपले पहिले दिवस विसरून गर्वानं फुगूं नये. कारण, सेवकाचं वैभव अशाश्वत छायेप्रमाणें असतं. जो सेवक आपला इतबार ओळखतो त्यालाच कालांतरानं धनीपणा येतो. नोकरानं यजमानाच्या श्रेष्ठत्वाचा हेवा करूं नये. धनी बोलेल तेंच खरं मानून नंतर धनी खुषीत असेल तेव्हां विनीत होऊन जें सागणं तें सांगावं. श्रेष्ठांना आपण होऊन बुद्धि शिकवूं नये. धन्याच्या आज्ञे-

वेगळं वागून मी मी करून पुढें पुढें करूं नये. स्वतः स्वतंत्रपणें स्वतःचं शहाणपण आजमावून पाहिल्याशिवाय धन्यापुढें त्याचा प्रकाश पाडण्याच्या खटपटी करूं नयेत. लाचलुचपती खाऊन धन्याच्या नुकसानासारखं अन्यायाचं वर्तन करणारा—दगलबाज नोकर होय. ज्याच्याकरतां प्राणी वाढले त्यालाच जर ते आडवूं लागले, तर वेळेस मोलवान घोडा आडला असतां त्याचे जसे पाय तोडावे लागतात, त्याचप्रमाणें ते आपल्या पायांस मुकतात. स्वार्थी तत्पर राहून यजमानाचं कार्य बुडवण्यानं सेवक स्वार्थालाही बुडतो. असा हा सेवाधर्म मोठा बिकट आहे. हा धर्म समजावून घेऊन आणि अनुभवून पाहूनही जे त्यापासून पराङ्मुख होतात त्यांस कुठेंच गति मिळत नाहीं. ( उठून ) हा सेवाधर्म केवळ तुम्हांलाच सांगितला असं नाहीं. शिवबांच्या सर्व सेवकांनां तुमच्या मार्फत हा समजून—तुम्हांसह सर्वांनीं ह्याप्रमाणें वागावं.

**बाळाजी**—समर्थ सर्व जाणतच आहेत. आज्ञेप्रमाणें यथामति आणि यथाशक्ति सेवा करीतच आहें. सेवेंत अंतर पडल्यास न्यायाप्रमाणें शिक्षा किंवा क्षमा होईलच.

**निळो०**—ह्या देहांत जीव असेपर्यंत श्रवण केलेल्या सेवाधर्माप्रमाणेंच वागेन.

**रामदास**—तुम्हीं सर्व कुलीनच आहांत. जें सांगणं तें कुलीनासच सांगावं. यास्तव सर्वांनीं मिळून राजसेवा करीत आहांत तशीच पुढें करावी. त्यांतच कल्याण आहे.

**सर्व**—तथास्तु.

**रामदास**—आतां सर्वांनीं आमच्या कल्याण-स्वामींच्या बरोबर जावं. कल्याण, तुम्हीं राजेश्रींच्या बरोबर जाऊन श्रीरघुपतींचं दर्शन करवावं, आणि शिवबांना—स्वतः प्रसाद द्यावा अशी

श्रीचरणीं आमची विनंती सादर करावी. मंडळीसह त्रिरात्र राहून, नंतर निरोप द्यावा. आम्हीं आतां जातों. जयरामानं मिरजेस आमची आठवण काढली आहे. त्याच्यावर मोठा प्रसंग गुदरला आहे. तो सर्वांना नंतर कळेलच.

**शिवाजी**–आत्मानात्मविचार, स्वानुभव, राजधर्म आणि क्षात्रधर्म ह्या चौकड्याचं शिष्याला आंदण देऊन गुरुत्वाचा गंडाही दंडाला बांधला; पण मी मात्र गुरुदक्षिणेची विनंती करण्याचं चुकलों, याबद्दल माफी असावी.

**रामदास**–हो–खरंच. गुरुदक्षिणा घेणं राहिली खरी. ठीक आहे. मागतों ती द्यावी.

**शिवाजी**–आज्ञा प्रमाण.

**रामदास**–श्रींचा सांप्रदाय वाढवण्यासाठीं आमच्या पांच शिष्यांनां निरनिराळ्या गांवीं पांच मठ स्थापून द्यायचे आहेत. तेव्हां भोळाराम ह्याला करंजगांव प्रांत वऱ्हाड येथील, मुसळरामाला बेदर प्रांतींची, जयरामाला बालेघाटीं निलंग येथिल, त्रिंबक गोसावी ह्यांस औरंगाबादेची आणि देवीदासाला देवीगांवची-आशा पांच सनदा करून द्याव्या.

**शिवाजी**–हीं सर्व ठिकाणं सध्यांच्या आपल्या राज्य–मर्यादेच्या बाहेरचीं आहेत.

**रामदास**–शिवबा, हें तुम्ही आम्हांला काय सांगतां? सध्यां जेथपर्यंत तुमचं राज्य आहे तेथपर्यंत श्रींचा संप्रदाय पूर्णपणें वाढला असून, उत्तरेस शीखांच्या सध्यांच्या गुरूनं सुद्धां रामनामाचा संप्रदाय वाढवला आहे. तेव्हां जिथें तो संप्रदाय नाहीं तिथें वाढवण्याची आमची इच्छा असल्यामुळें आम्हीं भिन्न अशा पांच गांवांचीं नांवं सांगितलीं. देणं असतील तर द्या.

**शिवाजी**–त्या गांवांवर ताबा दुसऱ्या राजांचा आहे.

**रामदास**–ते राजे कोण आहेत?

**शिवाजी**–अविंध–म्लेंच्छ–आहेत.

**रामदास**–मग तुम्ही हातीं कोणचं काम घेतलं आहे ?

**शिवाजी**–माफी असावी. आज्ञेप्रमाणें सनदा करून देतों. त्या गांवीं सनदा घेऊन शिष्यवर्ग जाण्याच्या आधींच ते प्रांत जिंकून आपल्या राज्याला जोडले आहेत असं आपल्याला ऐकूं येईल.

**रामदास**–शाबास, शिवबा ! सध्यांचा वेळ जेवणांत सुद्धां खर्चायचा नसून म्लेंच्छनिर्दालन करून आपलं राज्य वाढवण्याचा आहे. तेव्हां बोलल्याप्रमाणें करावं. आम्हीं आतां जातों. मिरजेच्या दलालखान सुभेदाराला श्रीरामसेवक करावा अशी आम्हांला श्रींची आज्ञा झाली आहे.

**शिवाजी**–आतां एक इच्छा राहिली आहे. माझ्या हातून नित्य जो व्यवहार घडेल तो समर्थचरणीं नित्य निवेदन करून नित्य दर्शनसुख आणि तीर्थप्रसाद घडावा अशी इच्छा आहे. ती पूर्ण व्हावी.

**रामदास**–शिवबा, आम्हीं अरण्यवासी. तुम्हीं राजेलोक. तुम्हीं जसे नेहमीं स्वाऱ्या–शिकाऱ्यांत दंग राहून राज्यविस्तार करण्याच्या कामीं गुंतलेले राहणार–तद्वतच महाराष्ट्रधर्माचा प्रसार करून, मराठ्यांच्या हृदयांत स्वदेशवात्सल्य उत्पन्न करण्याच्या कामीं आम्हीं श्रींच्या आज्ञेचे बंदे गुलाम नेहमीं रानांवनांत, कधीं नगरांत राहून श्रींची आज्ञा बजावणार ! तेव्हां श्रींची इच्छा कशी पूर्ण व्हावी !

**शिवाजी**–तोड काढणार समर्थ आहेत.

**रामदास**–कल्याण, शिवबांच्या बरोबर त्यांच्या मातोश्रींस देण्याकरतां जें पादोदक दिलं आहे त्यांत गंध उगाळून, त्याची एक गोळी करून, शिवबांपाशीं द्या. शिवबा, ती गोळी ताईतांत

घालून तो ताईत नेहमीं गळ्यांत ठेवा. त्याचीच नेहमीं पूजा करून तीर्थ घ्यावं. ती पूजा आम्हांला पावेल. त्यालाच ऊद दाखविला आणि स्मरण केलं कीं, आमची भेट होईल. आतां काळजी करूं नये.

**कल्याण**—शिवराज, आपल्याला मख्य प्रमाण आज्ञा आहे. तेव्हां मनांत संशय आणूं नये.

**रामदास**—आम्हीं सांगितला हाच नियम तुम्हीं चालवावा.

**शिवाजी**—आज्ञा प्रमाण.

**रामदास**—ठीक आहे. आम्हीं आतां जातों.

**कल्याण**— **श्लोक.**

तुटे वाद संवाद तेथें करावा ।
विवेकें अहंभाव हा पालटावा ॥
जनीं बोलण्यासारखें आचरावें ।
क्रिया पालटे भक्तिपंथेंचि जावें ॥

**सर्व**—जयजय रघुवीर समर्थ!!

( सर्व जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

( मिरजेच्या रस्त्यावर जयरामस्वामी शिष्यांसह भजन करीत असतां सुभेदार दिलेलखान आणि कोतवाल वगैरे येतात. )

**जयराम**— **श्लोक.**

फुटेना तुटेना कदा देवराणा ।
चळेना ढळेना कदा दैन्यवाणा ॥
कळेना कळेना कदा लोचनासी ।
असेना दिसेना जना मीपणाशीं ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ! अहाहा! हें दोनच अक्षरांचं राम-नाम किती महत्वाचं आहे पहा! रा—ह्या अक्षराचा उच्चार केल्या-

बरोबर तोंड उघडून पोटांत सांठवलेल्या सर्व पापांना बाहेर पडण्याला खुला मार्ग मिळून-म-ह्या अक्षरानं तोंडाला कुलुप बसतं. मद्दा घोर अशा ह्या संसारांत राहून, बाह्यरंगी रमणीय रंगभूमीवर विहार करून, अंतीं राम ह्या दोनच पायरीच्या शिडीवरून प्राण्याला मोक्षाला जातां येतं. तेव्हां:—

अहो ज्या नरा राम-विश्वास नाहीं।
तया पामरा बाधिजे सर्व कांहीं॥
महाराज तो स्वामि कैवल्य दाता।
वृथा वाहणें देह संसार चिंता॥ २॥

( दिलेल आणि कोतवाल येतात. )

**दिलेल**—देखो कोतवाल साहेब, यह बम्मन जो हरागिझ् राम राम करके टाळ कूटता है उस्का मतलब क्या है? कहां है उस्का राम?

**कोतवाल**—राम गया उस्का अफलागमे! पेटभरनेके वास्ते यह ढोंग मचाताहै! वोह दर्गेमे, हम ऐसेही शुक्रे मौलाकी हमेषा बंदगी बजारहेता है तोभि हम्को अल्लाहुताला मिलता नहीं. और यह ढोंग मचानेवाले बेरामन हरगिझ् अप्नेको राम मिलता है, राम अप्नेपास है ऐसे झूट लफ्झ निकालके दुनियाको ठगाते है! ऐसे बदख्तर लोगोंको एकदम सूली चढाना—नहीं तो उस्की चोटिया काटके उस्की सुंता करकर उस्को मुसलमीन बनाना यह बिलकुल दुरुस्त है!

**जयराम**— **अभंग**

काया हे काळाची घेउनि जाणार॥ तुझेनि होणार काय बापा
काय बापा ऐसे जाणोनि नेणसी॥ मीमी म्हणतोसी वायांवीण
वायांवीण शीण केला जन्मवरी॥ दंभ लोकाचारी नागवण
नागवण झाली परलोकां जातां॥ स्वहिताची चिंता केली नाहीं
केली नाहीं चिंता नामीं कानकोडें॥ अंती कोण्या तोंडें जात आहे

**दिलेल**—देख पंडत, खाली गरबड करनेसे मुफ्त मुफ्लसीमें गिरफ्दार होगा! तुमारा राम कहां है सो मुजे बताव! नहीं तो यह गो-गोष्त खाना पडेगा यह खूब समजो!

**जयराम**—रामसमर्थ कुठें आहेत? हा आपला प्रश्न-शेवाळानं पृष्ठभाग झांकलेल्या सरोवरांत पाणी कुठें आहे असं विचारण्यापैकींच आहे.

**दिलेल**—यह तुमारे इल्म-ई-हिक्मत जानने नही चाहते. एकदम वोह कहां है सो मुजे बताव!

**जयराम**—एखाद्या कृपणाचं चित्त जसं सुवर्णराशिकडे एकाग्र असतं तद्वत् आपलं मन रामसमर्थांच्या ध्यानीं लावलं असतां ते पाय दिसतात.

**दिलेल**—देख ऐसी लंबीचवडी बाते करके तुम हमारा तन बबूला कर रहा है!

**जयराम**—कूपमंडूकाला अगर उंबरांतल्या कीटकाला कूप अगर उंबर यांपेक्षां दुनियेंत कांहीं अधिक मोठं नाहींसं वाटतं. तद्वतच तुम्हां धर्मवेड्यांची स्थिति आहे. सूर्याचं ऊन जिथें जिथें पडतं तिथें तिथें तें एकाकार असतं; पण पाणी, आरसे, झिलई दिलेले धातूंचे पत्रे यांसारखे जे चकचकीत पदार्थ असतात ते त्याचं पूर्ण रीतीनं परावर्तन करतात. हीच स्थिति आत्मज्ञानाची आहे. त्याचा उजेड सर्व हृदयांवर सारखा पडतो; परंतु पवित्र साधूंचीं निर्मळ हृदयं त्याचं पुरं परावर्तन करतात. आणि तें परावर्तन जर तुम्हांला बघायचं असेल तर आमचे सद्गुरू समर्थ रामदास हे प्रत्यक्ष दाखवतील.

**दिलेल**—जरूर देखना है! कहां है वोह तुमारा उस्ताद? बुलाव उस्को!

**जयराम**—बोलावणं धाडलं आहे.

**दिलेल**-कितने देर उस्की राह् देखना? कोतवाल, बुद्‌पुरस्तको अपने धरम मुआफक, अपनेमें, उस्की सुंता करकर लेलेइंगे, तो अल्लाहुतालाकी अप्ने उप्पर बडी मेहेरवानी होगी नहीं? अच्छा, उस्को मुसलमीन बनानेकी तयारी करो.

**कोतवाल**-अल्-अहम्द-उल्लिला! बेरामन बडा ढोंगी! चल तयार होजा! हजामको लेआता है! (जातो.)

**जयराम**-काय हा माझ्यावर प्रसंग! सद्गुरु रामदास स्वामी महाराज, आपल्या ह्या शिष्याला हे यवन आज आपल्यामधून फरफर ओढून नेण्याला तयार झाले आहेत, ह्याची लाज राखणं आपल्याकडे आहे. यावनी धर्माचा उच्छेद न करतां आपला धर्म संस्थापित करून ह्या यावनी अमलाचा प्रतिकार करण्याचं जें आपलं ब्रीद तें आज आतां ह्या ठिकाणीं गलितधैर्य होऊं दिलं असतां आम्हां ब्राह्मणांची वाट काय होणार?

**अभंग.**

**आतां शरण कोणा जावें ॥ सत्य कोणातें मानावें**
**नाना पंथ नाना मतें ॥ भूमंडळीं असंख्यातें**
**आतां कोठें धरूं भाव ॥ बहू साल झाले देव**

(पडद्यांत रामदास म्हणतात.)

**शरण जावें संतजना ॥ सत्य मानावें निर्गुणा**
**नानामतीं काय चाडी ॥ करणें सत्याचे नीवडी**

**श्लोक.**

**समर्थाचिया सेवका वक्र पाहे ॥**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥**
**जयाची लिला वर्णिती लोक तीन्हीं ॥**
**नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥**

जयजय रघुवीर समर्थ!

**जयराम**–अहाहा ! **अभंग.**

**भावनेचा देव भावार्थें भावीला ॥ देव भक्त झाला भावनेचा ॥**
**भावनेचा देव भावनेचा भक्त । भावनेनें मुक्त भावीतसे ॥ १ ॥**

**रामदास**–( प्रवेशकरून ) देवाचं भजन न करतां ह्या संसारांत माझं तुझं करून शेवटीं बरोबर कांहीं न नेतां, एकटंच्च अधोगतीला जाण्यापेक्षां, रामनामाच्या भजनानं संसारयात्रा शेवटास नेणं चांगलं !

**मिरा**–( एकदम येऊन स्वगत ) यह हिंदु फकीरका मिजाज तो बहोत करडा नजर आता है ! उस् सबब्से और उस्के शकल्से दिखाई आती है दानिष्‌मंदीसे वोह बडा और अस्सल दर्जेका अव्वल हिंदूओंका काजीशरीफ नजर आता है !

**दिलेल**–अप् कौन हो !

**रामदास**–जातीचा अस्सल ब्राह्मण आहें.

**दिलेल**–यह अच्ची अप्‌के पैछानका है ?

**रामदास**–अलबत !

**दिलेल**–उस्की और अप्‌की बिरादरी है ?

**जयराम**–हेच आमचे गुरू !

**दिलेल**–अच्छा, तो फेर बतलादे राम कहां है तुमारा ?

**रामदास**–सुभेदार दिलेलखांसाहेब, आपलं म्हणणं काय आहे कीं, "राम बताव." बाबारे, मक्काशरीफ एकदम जशी ह्या ठिकाणीं कागदावरच्या चित्राशिवाय दिसायची नाहीं तद्वतच रामदर्शनाचं आहे. मक्काशरीफला जाण्याकरितां जसे प्रवासाचे त्रास सोसावे लागतात तसेच रामरूप दृष्टीस पडण्यास या देहाला अत्यंत हाल भोगावे लागतात. वास्तविक पाह्मलं असतां, तुमचा रहिम आणि आमचा राम हे एकच आहेत. सरडा जसा भिन्न रंगांत प्रत्येकाला निराळ्या रंगाचा दिसतो, तद्वतच सर्वसाक्षी परमात्मा अनेक रूपांत

दिसत असल्यामुळें त्याला अनेक लोक अनेक रंगाचा समजून त्याप्रमाणें स्वबुद्धीनं नांवं देतात. ह्या मतांतरानं आज ह्या भूमंडळावर भिन्न पंथ जरी वास्तव्य करताहेत, तरी गार-गोटीच्या पोटीं जसा एकच विस्तव गुप्त असतो तसा तो सर्वांतर्यामीं एकच असून तीच शक्ति भिन्न रीतीनं ह्या जगांतले भिन्न चाळे करवते.

**दिलेल**—यह तुमारे गोईके तरकीबसे, तुम अप्नी गरूरी छोडके, यह सुभेदार दिलेलके हवाला होने चाहता है ऐसा समझ आता है! क्यौं कोतवाल साहेब, इस बारेमे यह हमारा कह्यना दुरुस्त है या नहीं?

**कोतवाल**—आपका कह्यना तो बेषक दुरुस्त है!

**दिलेल**—( पुढें होऊन ) बुत्–पुरस्ती बिलकुल झूट है! बुत् और बुत्–पुरस्तीका बुबानु मचानेवालेको नामोहरम करना ऐसा हमारे दीनका हुक्म है!

**रामदास**—आमच्या आर्यधर्माप्रमाणें जो न वागेल त्याला हूण म्हणतात. आम्हीं त्याच्याशीं कोणताही व्यवहार करीत नाहीं. त्याच्यापासून दूर राहून, मतमतांतरं शोधीत न बसतां, शक्य असल्यास आमच्या धर्माच्या आड येणारास आम्हीं योग्य शिक्षा करतो. दुसऱ्या धर्मांचा उच्छेद करणं आमचं ब्रीद नाहीं. परधर्मी आमच्या कैदेंत जरी असला, तरी त्याला त्याच्या धर्माप्रमाणेंच वागण्यास आम्हीं सांगतो. तुमचा किंवा इतर कोणचाही धर्म आमच्या धर्माप्रमाणें नाहीं. तुमचा धर्म, बलात्कारानं किंवा लबाडीनं दुसऱ्या धर्माची पायमल्ली करण्याला प्रोत्साहन देणारा आहे. तेव्हां आतां कोणच्या धर्माची विशेष प्रशंसा करता येईल तें–हे काजी साहेब मोकळ्या मनानं सांगतील अशीआमची खात्री आहे.

**मिरा**-( पुढें येऊन ) सच है के हिंदूओंका वैदिक धरम इन्सानियत और इल्म-ई-हिक्मतका प्यारा मकान है! और इस उर्जके ऊपरके सब दीनोंसे आला है!

**कोतवाल**-यह बात तो दुरुस्त है, लेकिन, तुम्हारे सब लोग शिवाजी लुटारूको अन्ना राजा समजके उस्को और उस्के कारवाईको बडे दिल्रुबाईसे देखते है और उस्को बडा दीन-दार समजते है यह बात कोन्से इल्मकी है ?

**दिलेल**-हां, कोतवाल साहेब-सवाल बराबर है!

**रामदास**-शिवाजी राजे जात्या क्षत्रिय असून, ते आपल्या क्षात्रधर्माला अनुसरूनच वागत आहेत. आमच्या धर्माचा उच्छेद करूं पहाणाऱ्या यवनांना शिक्षा लावण्याकरतां त्यांनीं हत्यार उचललं आहे. ते यवनांचं कुराण अगर मशीदी यांनां लवमात्र त्रास देत नाहींत! आपण एखादं उदाहरण सांगत असाल तर बोला?

**दिलेल**-बस्स् वोह निमक हराम है! जिस्का दादा और पिदर बिजापूरके पादशाहीका खोराक खाकर उस्को पैदाष करनेको जिंदे रहे और उस बदमाषकी पैदाष होतेही—

**रामदास**-हां खबरदार! माझ्यादेखत असले शब्द काढूं नकोस! ( कुबडींतला सळ ओढतो. )

**दिलेल**-तुम् क्या करोगे? कहां है वोह गो-गोष्त?

**नोकर**-( झांकलेलें ताट पुढें करून ) हुजूर!

**दिलेल**-चलो, तयार होजाव! तुमको हम् मुसलमीन बनाने चाहता है!

**रामदास**-काय-तूं आम्हांला मुसलमान करण्याची इच्छा करतोस? रामचंद्राची इच्छा आम्हीं ब्राह्मण राहावं अशीच आहे.

**दिलेल**-ऐसा है? तो अच्छा! तयार होकर वोह तुमारा

राम बताव—नही तो यह गो-गोष्त खानेको और सुंतेकेवास्ते तय्यार होजाव !

**रामदास**—अरे, आमच्या गोमातेचं मांस कधींतरी आम्हीं जिवंत असतां तुम्हां यवनांकडून आमच्या पुढें येईल काय ?

**दिलेल**—यह देख इधर है या नहीं ?

**रामदास**—काढ पाहूं झांकण ?

**दिलेल**—(झांकण काढतो. पेढेबरफी व फळावळ दिसते. नोकरावर रागावतो.) ऐरे बदमाष ! अभीके अभी सूलीपर चढाता है ! कोन है उधर ? उस्को एकसों चाबूकके फुंदना चढाव ! एकदम उस्को बुलबुल बनाव ! गो-गोष्त लानेको हुक्म दिया तो मिठाइ लाके ऐसे ऐन मोकेपर हमारी फजीहती किया. ऐसे रिस्वत लेनेवालेको सूली चढाने बिगर दूसरी बराबर सजा बिलकुल नही ! देखो कोतवाल, यह बेरामनको इस जायसे एक उंगुलभी हिलने मत देव ! हम खास जाकर उस हरामखोरको सूली चढाता है और गो-गोष्त लेकर आता है ! (नोकरासह जातो.)

**मिरा**—( स्वगत) यह बेरामन खुब्दखुद इस आसेंमे अल्लाके शकल्मे मेरेको मुलाखत देनेको आया है इस्मे कुछ शक नहीं. सुभेदार दिलेलखांके आंखोपर तबूबूरके मुसेहरी है ! गो-गोष्तकी मिठाई कैसी बनगयी इस्का सबब तहकीकतसे न सोंचकर उस् नोकरपर अभी वोह अम्रा करडा अमल याने अम्रे मजबूत मगजका अजवाला फैलानके उस्को दुनियापार कर देगा ! या अल्ला ! तेरी कुदरत ! ( उघड ) महाराज, अपने खातर मेरे दिलकी बराबर खुलावट होके आज दिनसे मै अपका दोस्त होने चाहता है ! उस्लिये यह् मेरा अरज कुबूल करना !

**रामदास**—परमेश्वर—भजनाशिवाय जोंपर्यंत तुम्हांला कोणचीच इच्छा नाहीं तोंपर्यंत सर्व जगच्च जर तुमचं मित्र आहे, तर

मी ही त्यांतलाच असल्या कारणानं तें नातं नवं जोडण्याचं कारण नाहीं. मात्र प्रसंगीं अविंधी जुलमाचा तुम्हीं प्रतिकार करून, परमेश्वराच्या खऱ्या स्वरूपाशीं तादात्म्य वागावं! तसं झालं म्हणजे विरोधभाव आपसुखच पतन पावून आपण एक होणार आहोंत.

**मिरा**–आपका महसुरा सच है! आपके कहेने मुआफक आजसे आप दोनो दोस्त होगये!

( दिलेल मांस घेऊन येतो. )

**दिलेल**–( आत्मगत ) उस बदमाषको तो सूली चढाया लेकिन यह् क्या बात है के हमारे मिरासाहेब यह् बेरामनके साथ बडे बिरादरीकी बाते कर रहे है! ( उघड ) क्यौं सांई मिरासाहेब, आपकी और यह् काफीरकी दोस्ती होगई?

**मिरा**–उनोने हम्को रामदर्सन किया, उसलिये हम् उस्का बिरादर होगया!

**दिलेल**–क्या, तुमको उस्का राम मिलगया? तुमको मिल्ता और हमको कैसा नहीं मिल्ता?

**मिरा**–गो-गोष्तकी मिठाई बनगयी इस्मेही हम्को जैसा राम मिलगया उस् मुआफक आपकोहि मिलगया है!

**दिलेल**–क्या वोह् जाने राम? गोष्तकी मिठाई रामने बनवाया?

**रामदास**–तुम्हीं त्या नोकराला व्यर्थ सुळावर चढवलंत! आम्हीं खरे रामभक्त असल्याकारणानं आमची अब्रू राखण्याकरतांच मांसाला परमेश्वरानं मिठाइचं रूप दिलं!

**दिलेल**–मै तो जानतां है के तुम बडा जादूगार होगा! इस वास्ते वैसा होगया! यह देखो फिर गो-गोष्त लाया है! बनाव उस्के गुल! नहीं तो तुमारा राम बताव, अगर्चे यह खानेको तयार होजाव!

**रामदास**–तुमचं म्हणणं काय ‘राम बताव’! ठीक आहे.

तुम्हांला रामदर्शन हवं असेल तर मी जातों त्या मार्गानं या म्हणजे तें होईल.

**दिलेल**–मुजे कुबूल है !

**रामदास**–चला माझ्यामागून. ( रामदास व जयराम किल्याच्या तटावर जाऊन तेथील जंगीतून रस्त्यावर येतात व मिरा आणि दिलेल वरच राहतात. ) चला–या माझ्या मागून ! वर तटावर कां उभे ? रामदर्शन पाहिजेना ?

**दिलेल**–( तटावरून ) यह किलेके दिवारके इतने छोटे रंदेसे हम्ने नीचे कैसे आना ?

**रामदास**–आम्हीं दोघे जसे आलों तसेच तुम्हीं दोघे या !

**दिलेल**–नही आने सक्ते.

**रामदास**- तरमग राम दिसत नाहीं. ( दिलेल धांवत येतो ).

**दिलेल**–बस् तुम् बडा जादूगार है ! उस सबबसे तुम वोह किलेके दिवारके इतने छोटे रंदेसे यह जयरामके साथ निकल-गया ! वोह कुछ नहीं ! यह गो-गोष्तके फूलों बनाव !

**रामदास**–अहो पण मांस आहे कुठें ?

**दिलेल**–यह देख !

**रामदास**–त्याच्यावरचा रुमाल काढ पाहूं ?

( रुमाल काढतो. फुलांच्या माळा दिसतात. मिरा येतो. )

**मिरा**–क्यौं सुभेदार साहेब, दिलरुबाई हो चुकी ?

**दिलेल**–बेषख हो चुकी ! महाराज, आपको बहोत तकलीफ दिया उसवास्ते आपकी मै बंदगी बजाताहूं ! आप तो सच्चे साई हो ! आजसे मै आपका ताबेदार शागीर्द बनगया है !

**रामदास**–शिष्या झालास हेंच बरं झालं ! तूं आपल्याच धर्मांत राहून परपीडनाचं तत्व सोडून आमचं भूतदयेचं तत्व यापुढें नेहमीं ध्यानांत ठेवावं असं तुला आमचं सांगणं आहे ! तूं आम्हांला उस्ताद मानलं आहेस तेव्हां आतां आमच्या धर्माचा

छल करणारांस शिक्षा लावण्यास जो शिवाजी राजा सज्ज झाला आहे त्याला मदत करण्याच्या वचनाची तूं आम्हांला गुरुदक्षणा दिली पाहिजे आणि या मिरजेंत श्रीच्या रामदासी मठाची स्थापना झाली पाहिजे.

**दिलेल**–आपके कहेने मुआफक करनेको मै तयार हूं!

**रामदास**–ठीक आहे. आमची वेणु म्हणून जी शिष्यिण आहे तिलाच मठाध्यक्ष करावं म्हणजे झालं.

**मिरा**–तो फेर वोह् फूलोंके शेरे उस्तादके बदनको चढादेना मंजूर है!

( **रामदास** आणि **जयराम** यांच्या गळ्यांत माळा घालतो व हात जोडून उभा राहतो. )

**रामदास**–सुजनहो-ऐका! ह्या जगांत परमेश्वरानं आपल्याला जें उत्पन्न केलं आहे तें दुसऱ्याला पीडा देण्याकरतां नव्हे. आपल्याला जर कोणी दुःख देईल तर आपण त्याचं योग्य न्यायानं निवारण करून, नंतर परमार्थासारख्या अद्वितीय सुखांत निमग्न होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हीच गोष्ट शिवराजांची आहे. स्वधर्मबांधवानां यवनांकडून अत्यंत त्रास होऊं लागल्यामुळेंच शिवराजांनीं स्वदेशबांधवांच्या दुःखाचा प्रतिकार करण्याकरतां श्रीजगदंबा भवानीला साह्यार्थ घेतली आहे. खरं पाह्यलं असतां हा संसार म्हणजे काय आहे? चिताऱ्यानं रंगवलेली ही एक भिंत आहे. मृगजळ आहे. बुडबुडा आहे. फुटला कीं झालं. एवढंच नव्हे तर, सृष्टी निर्माणकालीं, उत्पन्न झालेल्या ह्या संसाराचं चित्र म्हणजे प्रत्यक्ष अग्नीचा भडका आहे. प्राण्याच्या जननाबरोबरच जसं केशांचं जनन झालेलं असतं तद्वतच ह्या संसार–वैश्वानराच्या पोटीं, प्राणी जन्माला आला म्हणजे मृत्यूही जन्माला येतो. अग्नी-एक-

सारखा टिकण्याकरतां जसं सर्पण लागतं, त्याचप्रमाणें संसार कृष्णवर्त्म्याचं सर्पण-प्राणी होय! संसाराच्या अग्नींत, प्राण्याला, लांकडांप्रमाणें जळून खाक झालं पाहिजे हें जरी खरं आहे, तरी तेंच मरण शांत आणि आनंदी चित्ताचं व्हावं असं जें प्रत्येकाला वाटतं-तें वाटणं प्राप्त करून घेण्यासाठीं—चंद्रासकट पृथ्वी जशी सूर्याच्या भोंवतीं फिरण्यांत निमग्न झाली आहे, तद्वत, आपण-भिन्न नांवांचा जो परमेश्वर—त्याच्याठाईं गुंग झालं पाहिजे. म्हणजे संसाराग्नींत जळणारं हें देहसर्पण सार्थ होतं आणि अंतीं निरिच्छ आनंदांत आत्मा गढून जातो.

**मिरा**—अहाहा-क्या बहार है!

**पद.**

**चातुर चातुरसे चुटका ॥ ध्रु० ॥ एक एक गुण परवाडी डारूं ॥ तन मेरी तोरी गयो तटका ॥ १ ॥ सुनत देखत गुण प्रगट लोकनमें ॥ अजब लागे चटका ॥ २ ॥ रामदास साईं सबघट व्यापक ॥ आनंदकी घटका ॥ ३ ॥**

**जयराम**—

**बहू ढींग मागें पुढें मोहरांचे ॥**
**मदोन्मत्त होऊनियां तेथ नाचे ॥**
**कळेना जळे रूप तें सर्पणींरे ॥**
**हरे राम हा मंत्र सोपा जपारे ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश चवथा.

**स्थळः**—प्रतापगडावरील देवीचें देऊळ.

**पात्रेंः—जिजाबाई, सईबाई, चंद्राबाई, गिरजाबाई, जिवा म्हाल्या** आणि दासी.

**जिवा०**—नव्हे का, तो प्रसंग फारच बहारीचा. सूर्याजीरावांच्या मागून आमचे मालक जेव्हांका कडाबीन घेऊन निघाले

तेव्हां कांहीं विचारूं नका! फार थोडक्यांत गेलं! नाहीं तर प्रसंग मोठा बिकट आला होता.

**जिजाबाई**—नाहीं तर कायरे झालं असतं?

**जिवा०**—तान्हाजी सिंहामागून तेही पण—

**गिरजा**—अरे असं अभद्र बोलूं नये!

**चंद्रा**—ह्याचा साराच धोपट मार्ग!

**जिजा०**—बरं मग पुढेंरे काय झालं? तो कोंडाणा किल्ला हस्तगत कसा झाला?

**जिवा०**—आई जगदंबेच्या कृपेनं, महाराजांच्या पुण्याईनं अन् तान्हाजीरावांच्या मरणानं! तान्हाजी सिंह गेला अन् गड हातीं आला म्हणून तर महाराजांनीं त्या गडाचं नांव सिंहगड ठेवलं आहे.

**सई**—पण तूं रे त्या लढाईंत काय करीत होतास?

**जिवा०**—मी तिथें काय करीत होतों तें ह्या तोंडानं सांगूं म्हणता बाईसाहेब? नकोरे देवा! महाराजांनीं जर माझी बढाई माझ्या तोंडातून बाहेर पडलेली ऐकली, तर ही जीभच जाईल. नकोरे बाबा! मी तिथें काय करीत होतों तें महाराजच सांगतील! पण एवढं मात्र खास कीं, मी होतों म्हणूनच तो किल्ला घेतांना महाराजांच्या जिवावरचा प्रसंग टळला.

**जिजा०**—धन्य आहेस तूं! पण एवढं मात्र लक्षांत ठेव कीं, तूं होतास म्हणून शिवबा वांचला असं मात्र त्याच्या देखत किंवा परोक्ष कधींच बोलूं नको. एखादवेळीं जिवाला मात्र मुकशील. आतां बोललास तो बोललास. अरे तुझ्या सारख्या बाळगोपाळांचं माझ्या शिवबाला साह्य आहे म्हणूनच तो आज, भगवंतानीं गीतेंत सांगितल्या प्रमाणें—फलाची इच्छा न धरतां आत्मयज्ञ करून स्वकर्म करण्यास झटत आहे. मागें सूर्यवंशी आणि चंद्रवंशी राजे असेच ह्या आर्यावर्तावर होऊन गेले.

गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करून, स्वकर्म यथासांग बजावणारे राजे ह्या आर्यावर्तावर जे होऊन गेले त्यांच्याच माळेंत माझा शेवबा मेरूमणी होणार आहे.

**जिवा०**–ह्यांत तर बिलकुल संशय नाहीं ! पण आतां होणारे आमचे धाकटे धनीसाहेब कसे होणार ?

**गिरजा**–म्हणजे, आतां महाराजानां मुलगा का होणार ?

**जिवा०**–म्हणजे संशय आहे कीं काय ?

**जिजा०**–कशावरून रे ?

**जिवा०**–मी कांहीं ज्योतिषी थोडाच आहें ? घरामधें ह्या चंद्राबाई रोज म्हणतात म्हणून मींही म्हणतों. त्या का खोटं बोलतात होय ? पण तसं झालं तर त्यामधें बिघडलं काय ?

**गिरजा**–अरे, त्यांत बिघडलं कांहीं नाहीं ; पण पहिली बेटी नि तूपरोटी !

**जिवा०**–आहे कुठें तूप अन् रोटी ? ती शत्रूनं उपटली आहे म्हणून तर आमचे महाराज त्यांच्याशीं रात्रंदिवस झुंज करताहेत. तेव्हां आतां तुम्हीच बघा किं, ह्यावेळीं तूपरोटीची फुकट बेटी हावी का शत्रूला मारणारा पहिला बेटा अन् सवाईसोटा हावा ?

**जिजा०**–अरे तूं कवित्व सुद्धां करतोस !

**जिवा०**–ह्या चंद्राबाई कवित्व करतात ! मी नाहीं ! त्यांनीं आमच्या होणाऱ्या धाकट्या धन्यांचे डोहाळे रचले आहेत ! घरीं रोज म्हणतात.

**जिजा०**–खरंच काहो, चंद्राबाई ?

**चंद्रा**–तुलारे कुणी सांगितलं होतं हें इथें बोलायला ?

**जिवा०**–अँ अन् रागावायला काय झालं ? धनीणीची कीर्ति न्हाकरानं गाऊं नये तर काय ज्याची त्यानंच गावी ? माझा

सूर गोड असता तर मीच ते डोहाळे म्हणून दाखवले असते. माझे सुद्धां पाठ झाले आहेत! पण मी पडलों करड्या आवाजाचा शिपाई गडी!

**जिजा०**–चंद्राबाई, म्हणा पाहूं? ऐकूं द्या तुमचं आमच्या सूनबाईवरचं कवित्व!

**चंद्रा**–कवित्व कसलं! पण तें मला पुरतंसं आठवत नाहीं! पाठ चांगलं न झाल्यामुळें चुकतं जरासं!

**जिवा०**–तुम्हीं आरंभ तर करा! चुकाल तिथें सुचवतों मी तुम्हांला!

**चंद्रा**–डोहाळे-पुरते कांहीं केलेले नाहींत-पण झाले आहेत तेवढेच म्हणतें! जिवा सूर देतोसना?

**जिवा०**–मग तर मग जरा दम धरा! घेऊन येतों!

**गिरजा**– काय तें?

**जिवा०**– तंबुरा!

**जिजा०**–जाऊं दे, तशाच म्हणा तुम्हीं आपल्या!

**चंद्रा**–

## डोहाळे.

( जिल्हा— धुमाळी. )

**नव शशिकर–उदयिं दृष्टि ती लावि जन जैशी ॥ राजाचि राणिवर तैशी ॥ ध्रु० ॥ नवमास कांति ती वदनिं चढत कशा रंगिं ॥ चढत कशा रंगीं ॥ रविउदयिं रात्रिच्या ढंगीं ॥ १ ॥ षट्पद कसे रविच्या कमलकोशिं ते दिसति ॥ कोशिं ते दिसती ॥ कुचमुखें धिकृतया वदती ॥ खाय चोरुनि रगड आड माती ती ॥ परि नृपा उमगे ती ॥ वसंत–ऋतुमाधिं गज जैसा तो ॥ ससित पल्वलिं तो ॥ बहु आधाशि स्नान जैं करितो ॥ तत्सम कितिक तरि चुंबि ॥ कितिक तरि चुंबि बळें तो राणी ॥ मुख–गंधिं गुंग होवोनी ॥ मुख लोध्रवर्ण ॥**






जणुं रात्र जीर्ण ॥ दावि प्रसू तूर्ण ॥ भाविचें स्वर्ण ॥ संतृप्त होइ नृपमन पूर्ण ॥ २ ॥ शारिकीं सूर किति राहे मंजुतो ॥ भाषणीं मिश्र जणुं राहे अर्थ तो ॥ सांगरांबरेच्या उदरिं गुप्तसा ठेवा ॥ गुप्तसा ठेवा ॥ राजास वाटतें राणिकडुन तो घ्यावा ॥ पुढति तो म्हणुनि हो जाई ॥ राणिच्या ॥ निरखि तो दृष्टिनेंग बाई ॥ प्रीतिच्या ॥ मग लाजूनि ॥ मान वळवूनि ॥ स्वमत दावूनि ॥ मुग्ध ती राहे ॥ देव जैं आहे ॥ हळुच ती पाहे ॥ लक्ष्मीस श्रीपती लाहे ॥ ३ ॥

**जिजा०**—कोण ह्या कवित्वाला नाक मुरडील ?

**गिरजा**—वर्णन मात्र अगदीं हुबेहुब केलं आहे हो !

**चंद्रा**—प्रसिद्ध कवींच्या तोडीला तोड थोडंच होणार आहे ?

( शिंगें, तुताऱ्या पडद्यांत वाजतात. )

**जिजा०**—समर्थांचा प्रसाद घेऊन आमचा शिवबा आला वाटतं ?

**जिवा०**—( पाहून ) होय आईसाहेब ! महाराज, चंद्राबाईचं धनी, गिरजाबाईचं यजमान—सगळेच आले !

(वर्णनाप्रमाणें सर्व येतात जिजाबाईशिवाय सर्व बायका उभ्या राहतात. दासी लिंबलोण करते. सर्व पुरुष जिजाबाईच्या पायां पडतात. )

**शिवाजी**—आई, मी समर्थांचं वर्णन काय करणार ? समर्थंच ते ? त्यांनीं माझ्यावर अनुग्रह करून, प्रथम आत्मानात्म विचाराच्या सिंहासनावर बशिवलं ! नंतर स्वानुभवाचा राजदंड माझ्या हातीं देऊन, राजधर्म आणि क्षात्रधर्म ह्या दोहोंच्या उपदेशांच्या छत्रचामरांचं आंदण दिलं आणि हा नारळ, ही माती, हे खडे आणि लीद—इतका प्रसाद दिला.

**जिजा०**—बाळ, ह्या प्रसादाचा अर्थ ध्यानांत आलाना ?

**शिवाजी**—आई, हें काय विचारणं ? हा नारळ माझ्या कल्याणार्थ असून, पृथ्विप्राप्तीचं चिन्ह ही माती आहे ! हे खडे अनेक किल्ल्यांच्या स्वामित्वाची सूचना करीत असून,

अश्वांच्या पागांचा संग्रह माझ्या पदरीं होणार असें ही लदि सांगते आहे.

**जिवा०**–( पुढें होऊन ) ह्या गरीब नोकराचा मुजरा घ्यायचा महाराज! आपल्या पदरीं जगदंबेनं सिंहगडासारखे कित्येक किल्ले ठेवावे अशी गोष्ट खरीच!

**शिवाजी**–अरे-जिवा म्हाल्या, तूं इथेंच आहेस का? ह्यानं आमचं फार मोठं काम केलं आहे. कोंडाणागडाची हवा राहण्यास चांगली म्हणून तो आपल्याला हवा असं आई तूं सांगितल्यावरून, तो जिंकून घेत असतां, माझ्या तान्हाजी सिंहाचा तिथें बळी पडला. त्यावेळींच हा शिवाजीही तान्हाजीच्या बरोबरच जात होता. परंतु हा जिवा म्हाल्या तिथें होता म्हणूनच आज मी इथें आहें. माझ्या हृदयाला विदीर्ण करण्याच्या नेमानं येणारी शत्रूची गोळी, ह्यानं मला खालीं बसवून जर आपल्या मांडीवर घेतली नसती तर आज मी ह्याचा ऋणी राहिलों नसतों. तेव्हांचं बक्षीस अद्याप ह्याला द्यायचं आहे. आतांच्या आतां ह्याला एक तोडा तर द्या. ( सईबाई आपल्या पायांतील एक तोडा त्याला देते व तो घेऊन तो आपल्या डोक्यावर ठेवतो. ) हेंरे काय? अरे पायांत घाल!

**जिवा०**–महाराज, माझी गरीबाची परीक्षा कशाला बघावी? माझ्या धन्याकडला प्रसाद प्रत्यक्ष लक्ष्मीकडून प्राप्त झाला, त्याला मीं आपल्या पायांत घालूं होय? छत्! आंब्याच्या मोहोराप्रमाणें हा माझ्या डोक्यावरच राहील!

**शिवाजी**–बरं–आई, हें समर्थांनीं आपलं चरणोदक तुम्हांला प्रसाद दिला आहे–हें घ्या!

**जिजा०**–( घेऊन ) बाळ, समर्थांच्या आशीर्वादानं तुझं कल्याण होवो! बरं आजची चांदण्याच्या डोहाळ जेवणाची रात्र

ठरली आहे! तूं येणारना यांना बरोबर घेऊन? आयतींच मोठालीं दंपत्यं होतील!

**शिवाजी**—आपल्या आज्ञेबाहेर मीं कधींच गेलों नाहीं.

**जिजा०**—बरं तर आम्हीं जातों आतां वाड्यांत. ( सर्व बायकांसह जिवा म्हाल्या जातो. )

**बाळाजी०**—महाराज, आपल्याशीं समेट करण्याच्या मिषानं, अजस्र सेनेसह अफ्‌जुल्‌खान येत आहे अशी जी बातमी कळली तिची आतां प्रथम व्यवस्था केली पाहिजे.

**शिवाजी**—बाळाजी, तें सर्व लबाडीचं वातावरण आहे हें पक्कं लक्षांत ठेवा. त्या प्रकरणांत भेद केल्याशिवाय दुसरी तोड नाहीं.

**निळो०**—त्यांचा तो ब्राह्मण वकील मोठा हट्टी आणि लांचलुचपतीचा द्वेष्टा असून, वचनाचा सच्चा आहे अशी त्याची कीर्ति आहे. त्याला सामील करून घेतल्यास कार्य होणार आहे.

**शिवाजी**—अहो, वेड तर नाहीं लागलं तुम्हाला? मेघमंडळाशीं स्पर्धा करणारे प्रचंड पर्वत आणि आपल्या उत्ताणखाट गर्वानं सूर्यावर थुंकणारे विस्तीर्ण महासागर वलांडून जे परक्या धर्माचे लोक आज ह्या आर्यावर्तातल्या संपत्तीकडे लाळ घोटीत हजारों कोसांवरून येऊन राज्य करताहेत, ते सर्व तुमच्या सारखेच, फलाची इच्छा न धरतां स्वकर्म करणारे आहेत असं कसं म्हणतां?

**जिवा०**—( प्रवेश करून ) विजापूरकरांकडल्या अफ्‌जुल्‌खान सरदाराचे वकील आले आहेत महाराजांनां भेटण्याकरतां.

**शिवाजी**—निळाजीपंत, सामोरे जाऊन त्यानां आदरानं घेऊन या! ( जातात. )

**बाळाजी**—वकीली कावा लढवण्याकरतां वकीलसाहेब तर येऊन ठेपलेच. प्रसंग बिकट दिसतो खरा.

**शिवाजी**–अहो, परक्यानीं आमचं स्वराज्य ढेंकर देऊन जरी पचवलं आहे आणि त्यामुळें स्वराज्याचा गड स्वाधीन करून घेणं असाध्य आहे असं वाटत आहे, तरी प्रत्येकजण जर निराश होऊन, चिंतामणी सारख्या ह्या भरतभूमीच्या मंदिरांत स्वस्थ बसला तर कसं होणार? होत असलेले माझ्या देशबांधवांचे हाल कोणच्या डोळ्यानं बघवणार? खऱ्या आर्यपुत्रांचे हात, बंदीजनां-प्रमाणें परकीयांपुढें जोडलेले कोणच्या हृदयाला सहन होणार? ( वकीलासह निळो सोनदेव येतात. )

**बाळाजी**–( उठून ) या वकील साहेब! हे पहा आमचे महाराज–आपलीच वाट बघत बसले आहेत. बसायचं असं!

**वकील**–हुजूर, विजापूरच्या तक्ताचे बड्या खानदानीचे फौज-बक्ष सरदार अफ्‌जुल्‌खां साहेब, हे आपल्या प्रचंड सैन्यासह आपल्याशीं विजापूरच्या तक्ताचं समेट करण्याकरतां आले असून, माझ्या मार्फत त्यांनीं आपल्याला अनेक सलाम प्रविष्ट केले आहेत. त्यांच्या गोटांत त्यांनीं आपल्याशीं मुलाखत घेण्याची इच्छा प्रदर्शित केली आहे. आपला आणि विजापूरच्या तख्ताचा समेट व्हावा ह्याच इच्छेनं आपले वडील, राजे शहाजी यांस, हुजूरकडून मेहेर नजरेनं बंधमुक्त करण्यांत आले आहेत.

**शिवाजी**–समेट करण्याकरतां प्रचंड सेनेची काय जरूर होती? शिवाय आपणांसारख्या ब्राह्मणानं स्वकर्म सोडून, यवनांच्या दास्यांत बोलावणेकऱ्याची कामगिरी करण्याचं तरी काय प्रयोजन होतं? सध्यां आपण पत्करलेलं काम म्हणजे ब्राह्मणानीं शूद्राचं आचरण करण्यासारखंच नव्हे काय? ब्राह्मणांनीं आमच्या सारख्या आर्यक्षत्रियाला मदत करून आपल्या क्रिया निर्विघ्न चालवण्याला आमची मदत घेण्याच्या

ऐवजीं, वैदिक धर्माशीं विरोध करणाऱ्या, अविंधानां जर ते फितूर होऊं लागले, तर त्यांनां कोणच्या धर्माचे मानावे? गुलामाप्रमाणें यवनांची सेवा करून, स्वधर्मी क्षत्रियाला जर एखादा ब्राह्मण यवनांच्या कपटजालांत गुंतवूं लागला, तर तो ब्राह्मण ह्या श्रेष्ठ पदवीला पात्र होईल काय?

**वकील**–आपलं बोलणं मला समजतं! पण उपाय नाहीं. कारण सध्यां स्वातंत्र्याबद्दलचं भविष्य वर्तवणं म्हणजे वांझेच्या नशीबीं पोरं किती आहेत हें उदाहरण सोडवण्याच्या व्यर्थ खटपटी सारखंच निष्फळ आहे. आम्हां हिंदूंची स्थिति म्हणजे, दोन उंच गिरिशिखरानां जोडणाऱ्या अशाश्वत अशा पुलावरील भयप्रद मार्ग क्रंठणाऱ्या गाड्याप्रमाणें झाली आहे. इकडे विजापूरकर आणि तिकडे दिल्लीपति. ह्या दोन प्रचंड हत्तींच्या पायांपाशीं आज आम्हीं हिंदु पूर्णपणें सांपडलों आहों. म्हणून हताश झालेल्या ह्या आर्यावर्ताला पुन्हां स्वातंत्र्याचे दिवस दिसणं अशक्य आहे.

**शिवाजी**–समशेरीचा उपयोग जसा आणिबाणीच्या वेळींच कळतो त्याचप्रमाणें सिंहाचा पराक्रम हत्तींच्या कळपांतच कळतो. बिकट प्रसंगीं धैर्यच उपयोगीं पडतं. प्रत्येकानं स्वधर्म ओळखून वर्तन करण्याला जर आरंभ केला, तर त्यांत त्याच्या हातून होणारी एखादी चूक त्याच्या फायद्याचीच होते. ईश्वरावर भार टाकून स्वकर्तव्यांत गुंग झालं असतां, निराशेची आशाच नको.

**वकील**–आपण आरंभलेला उद्योग किति बिकट आहे आणि तो शेवटास जाण्याला रस्त्यांत किती विघ्नं आहेत हें आपण जाणतच आहांत.

**शिवाजी**–स्वकर्माचरणांत जे अडथळे येतात त्यांचा धैर्यानं स्वीकार करून, जगदंबेच्या स्तवनानं त्यांचं भस्म करून

टाकावं! स्वकर्मांची निवड करतांना, अवघड मार्ग स्वीकारला असतां उन्नती झपाट्यानं होते.

**वकील**–स्वकर्म कळत असतांही धैर्याच्या किल्याला भीतीच्या धरणीकंपाचे जोरदार धक्के बसून तो ढांसळतो त्याला उपाय काय ?

**शिवाजी**–धैर्य न सोडतां सत्यपक्षाला मगरमिठी मारून आत्मोन्नती करून घेणं हाच ह्याला उपाय! मात्र सत्य जाणण्याची इच्छा पाहिजे–म्हणजे, आपोआप तें कळतं. आसपास नजर देऊन जर पाहिलं तर सर्व जगभर स्त्रिया आणि पुरुष आत्मोन्नतीकरतां आपापल्यापरी धडपडत आहेत असंच दिसेल. असं असतां, अधैर्याच्या कंबरपट्याला जर आपण भीतीची तलवार बांधली, तर त्या स्त्रीपुरुषांत आपली गणना करतां येईल काय? ज्यांस स्वकर्तव्य कळलं आहे परंतु साह्य नाहीं त्यांस आपणांसारख्या ज्ञात्यांनीं साह्य करायला नको काय ? ज्याची स्वकर्तव्यांत उन्नती झाली तो सर्व जगभर प्रकाशमान होतो. आपल्या स्वदेशबांधवानां–एकधर्मीयानां–फसवून, गोत्यांत घालण्याचं आपलं काम नसून त्यांनां मदत करण्याचं आहे. आज तुम्हीं आनंदांत असाल, ऐहिक सुखाचा पूर्ण उपभोग घेत असाल, परंतु ह्या स्वार्थसाधुत्वाचं–प्रायश्चित्त, तुमच्या पुढच्या पिढीला दुःख हेंच आहे. म्हणून आपलं सुख घटकाभर बाजूला ठेवून, अडचणींत पडलेल्यांची अडचण दूर करा. आपण सर्व एकच आहोंत, परंतु हे विधर्मी यवन मात्र भिन्न आहेत.

**वकील**–आपल्या बोलण्याचा सर्व भाव माझ्या लक्षांत आला; पण त्याचा उपयोग नाहीं. आपल्याला सहीसुद्धां करतां येत नाहीं अशी आपली कीर्ति असतां, आपल्यासारख्याच्या तोंडून,

असले जाड्या विद्वानाचे संस्कृत विचार आज मला एखाद्या वक्त्यासारखे ऐकूं आले, ह्यावरून आपल्या विद्वत्तेची तारीफ करण्यासारखी आहे हें पाहून मला आनंद होत आहे; परंतु तोही निरुपयोगीच आहे. कारण, आजपर्यंत ज्याचं अन्न खाल्लं त्याच्याशीं आपल्याप्रमाणेंच मीही दगा करणं ही गोष्ट परमेश्वराच्या घरीं मोठी चूक गणली जाणार आहे.

**शिवाजी**–एखादा बलाढ्य चोर, आमच्या घरावर दरोडा मारून, आमचं तें आपलंच असं म्हणून, त्यांतले दोन घांस, आम्हाला, आमच्याकडून गुलामासारखी सेवा घेण्याच्या उद्देशानं जर देऊं लागला आणि ते नाकारून आम्हीं जर आमचं गेलेलं सर्वस्व परत मिळवूं लागलों, तर परमेश्वराच्या घरीं आम्हीं कोणच्या न्यायानं दोषास पात्र होऊं तें सांगाल काय? अशा कामांत तुमच्या मनानं चुकी होत असेल तर होऊं द्या! त्याबद्दलचा परमेश्वरी कोप भोगण्यास हा शिवाजी तयार आहे. पण स्वकर्मपराङ्मुख होऊं नका! ह्यानंच तुम्हांला शांततेच्या घरांत आनंदानं सुख प्राप्त होणार आहे. परकीयांच्या राजवाड्यांतल्या प्रधानकीपेक्षां, स्वातंत्र्यांतल्या झोंपडीचा धनीपणा बरा.

**वकील**–तसं होण्यास उपाय काय?

**शिवाजी**–ऐक्याची वृद्धी!

**वकील**–अपार समुद्राशीं शेंकडों नद्यांच्या खळखळाटांचं काय चालणार?

**शिवाजी**–शेंकडों नद्यांचीं मुखं एकत्र होऊन, जर महासागरावर चाल करून जातील, तर त्याला खात्रीनं कित्येक योजनं मागं सरावं लागून, नद्यांच्या मधुर पाण्याला साम्राज्य करूं द्यावं लागेल. गंगा, सिंधु, ब्रह्मपुत्र–ह्यांपैकीं स्वतंत्रपणें प्रत्येकाची प्रत्यक्ष प्रमाणं ध्यानांत आणा म्हणजे झालं.

**वकील**—आपलं म्हणणं वास्तविक आहे. बोला तर मग मी आपल्याकरतां काय केलं असतां आपलं बोलणं यथार्थ होईल ?

**शिवाजी**—ज्या धर्मांत आपण जन्म पावून जें ब्रह्मकुल आपण शोभवलं आहे त्या दोहोंच्या उन्नतीकरतां आपला देह आमरणांत झिजवण्याची शपथ घ्या आणि ती पुरी करा म्हणजे झालं ह्या तुमच्या देशाचं काम ! त्यांतच तुमचा धर्माभिमान आणि देशाभिमान प्रगट होणार असून, आर्यपुत्राचा जन्म सफल होणार आहे.

**वकील**—ठीक आहे ! ह्या जगदंबेचीच शपथ घेऊन सांगतों कीं, जो अफ्‌जुल्‌खान पूर्ण कपटानं तुम्हांला पकडून नेण्याकरतां लोखंडाचा पिंजरा बरोबर घेऊन आला आहे, त्याला अचानक आपल्या स्वाधीन करून देतों. मग पुढें तुमचं तुम्हीं पाहून घ्या. हे घ्या वचन. ( वचन देतो. ) आतां ह्यापुढें मात्र काम खतल होईपर्यंत आपल्याला पूर्णपणें माझ्या सल्यानं वागलं पाहिजे.

**शिवाजी**—कबूल आहे. ‘ आपल्या गोटांत येण्यास शिवाजी भितो. तो आपली मुलाकात, प्रतापगडावर मोठ्या नम्रतेनं घेण्याची इच्छा दर्शवीत आहे. विजापूरच्या तक्ताशीं सल्ला करण्याची त्याची पूर्ण इच्छा आहे.’ असल्या तऱ्हेच्या भाषणानं तुम्हीं त्याला भुरळ पाडून, आमची पूर्ण नम्रता त्याच्या मनांत भरवा आणि तो रडतोंडीच्या घाटानं प्रतापगडावर येण्याची मसलत करा—म्हणजे पुढें सर्व आम्हीं व्यवस्थित करूं.

**वकील**—ठरला बेत. आतां घेतों आपली रुक्सत.

**शिवाजी**—निळोपंत, आपल्या नव्या झालेल्या ह्या मित्राचं स्वागत करून, ह्यांना समारंभानं ह्यांच्या छावणींत पोंचते करण्याची तजवीज करा. ( नजराणा देऊन वकीलासह निळोपंत जातात. )

**बाळाजी**–योजलेल्या महत्कार्यापैकीं अर्ध तर उरकलं !

**शिवाजी**–पण आतां जें अर्ध राह्यलं आहे-तें–झालं ह्याच्या किती तरी पट अधिक अवघड आहे. स्वानुभवापुढें पुस्तकी विद्या जशी कुच कामाची तसंच हें आहे. कृमि झालेल्या माणसाला दूध आणि साखर हीं जशीं अहितकारक तद्वतच धैर्य खचूं पाहणाऱ्या माझ्या हृदयाला माझं मन ह्या वेळीं झालं आहे. डोळ्यांपुढें सर्व शून्य दिसत आहे. त्या अफ्‌जुलाच्या अफाट सेनासागरापुढें माझ्या मूठभर लंगोट्यांचा कसा टिकाव लागणार? मी दुसऱ्याला धैर्य देणारा पण माझीच सध्यां कशी भयप्रद स्थिति झाली आहे पहा !

**बाळाजी**–महाराज, प्रसंगाला पाठ दिलीच पाहिजे ! सत्य-पक्ष नेहमींचाच विजयी आहे–असं जें आपण म्हणतां, त्याला हरताळ कसा लागेल? सध्यां वारा दक्षिणेचा असल्यामुळें आम्हां मराठ्यांच्या नुसत्या–विजयी-आणि-एकीच्या-श्वासोच्छ्वा-सानंच हे यवन गुदमरून जाऊन थंड पहाडांचा त्यानां आश्रय धरावा लागणार आहे. असं असतां, आमची हत्यारं काय करणार नाहींत? आपणच असा धीर सोडला तर आम्हीं सेव-कांनीं काय करावं ! आपल्याच प्रतापरवीनं आम्हांला छाया प्राप्त झाली आहे ! मूळचे आम्हीं अंधारच.

**शिवाजी**–बाळाजी, ह्या वेळेला जर समर्थदर्शन होईल तर खचित युक्तीच्या उपदेशाचा चंद्रप्रकाश राजमार्गावर पडून आपल्याला शीतळ प्रकाशांत-फार घोर कर्म-सुलभपणानं उर-कतां येणार आहे. ह्या प्रचंड प्रसंगाला आपण मुंगीप्रमाणें चिरडून टाकूं.

**बाळाजी**–महाराज, समर्थ आपल्या स्वाधीन थोडेच आहेत. आज नगरांत तर उद्यां रानांत, अशी त्यांची स्थिति. त्यानां कोठें

म्हणून शोधावं? आलेला प्रसंग सर्वांच्या मसलतीनं पार पाडलाच पाहिजे.

**शिवाजी**—कांहीं असो! समर्थांचं दर्शन झाल्याशिवाय कोणचंच काम कर्तव्य नाहीं. ह्या प्रसंगांत प्राण जावो अथवा राहो! दर्शन झालं नाहीं तर कांहींच कर्तव्य नाहीं.

( ताईताला उदबत्ती दाखवतो व **रामदास** एकदम येतात. )

**रामदास**—सिंह भीतीनं व्याकुळ झालेला कधीं ऐकलं आहे काय? तो आपला धर्म विसरून जाऊन भलतीच गोष्ट कशी करील? राजमार्गानं गेलं असतां हानी होण्याची मुळींच भीति नाहीं. हें तत्व लक्षांत ठेवून क्षत्रिय जर आपल्या धर्मानं वागला तर त्याला कधींच इजा होणार नाहीं. युद्धासारखीं कृत्यं म्हणजे क्षत्रियांच्या मनोरंजक गोष्टी. असं असतां—बाप्पा शिवबा, आज तूं हें काय आरंभलं आहेस? चल—ऊठ—मन निर्दोष कर आणि युद्धाला तयार हो! प्राप्त झालेलं हें ह्या अफ्‌जुलाशीं युद्ध म्हणजे तुझ्या भाग्योदयाच्या बालरवीचा उदय आहे! ह्या युद्धानं तुला पृथ्वीवर—स्वर्गसुखाच्या दरवाज्यांत डोकावण्याची संधी आली आहे. प्रत्यक्ष प्रतापमूर्ति उदयाला येत आहे. कीर्ति—प्रेमानं वेडी होऊन—तुला माळ घालण्याला सज्ज झाली आहे. क्षत्रियाला महत्पुण्याशिवाय युद्धाचा प्रसंग येत नसतो. जांभई देण्याकरतां पसरलेल्या तोंडांत जसं अवचित अमृत पडावं तसंच हें युद्ध—शिवबा, तुला प्राप्त झालं आहे! ह्याला विष म्हणून थुंकण्याचा प्रयत्न करूं नको. भयानं व्याकूळ होऊन तूं जर हें युद्ध करणार नाहींस तर अनंत पापं तुला सोधीत येऊन—रणांगणांत पडलेल्या प्रेताचे लचके तोडणाऱ्या गिधाडांप्रमाणें तीं तुझी स्थिति करतील! लाभहानी, जयापजय, सुखदुःख—हीं सर्व समान मानून,

महत्कार्याकरतां युद्ध कर. विजयी झालास तर देशोदेशींचे थोर योद्धे तुझे भाट बनतील! पराजित झालास तर अत्यानंदाचं स्वर्गसौख्य मिळेल!

**शिवाजी**–महाराज, मी युद्धाला मुळींच भीत नाहीं. प्रसंग अत्यंत बिकट असल्यामुळे आपल्या बुद्धिवादानं खतल करावा अशी खरी इच्छा होती–आणि म्हणूनच भेटीची इच्छा धरून बसलों होतों. समर्थांनी ती पूर्ण केली!

**रामदास**–शिवबा, तूं राज्यकारभार करतोस. त्यांत कोणें समयीं कसा प्रसंग येईल याचा नेम नाहीं. आणि तुमचा नेम तर हा असा आहे. तेव्हां तो चालणार कसा? प्रसंग येईल तशी मसलत करून काम करित जावं!

**शिवाजी**–महाराज, दौलतीचा तो विषय काय? आज्ञेवांचून पाऊल टाकणार नाहीं.

**रामदास**–शिवबा, धन्य आहेस तूं! याकाळीं तूं केवळ जनक राजाच आहेस! परमार्थदृष्टीनं जर बघितलं तर आम्हीं सतत तुझ्यापाशींच आहोंत असं तुला आढळेल! ही गोष्ट लौकिकदृष्टीनं मात्र कळण्यासारखी नाहीं. एवढ्याकरतां, कार्य प्राप्त होईल तेव्हां श्री कुलदेवीस विनंती करून, आज्ञा होईल तसं करीत जा!

**शिवाजी**–देवी तर प्रत्यक्ष नाहीं. तेव्हां विनंति कोठें करावी? आणि आज्ञा होणार कशी?

**रामदास**–राजा, शुचिर्भूत होऊन, तूं-आप्तवर्गांतला एक चांगला लिहिणारा व एक प्रश्न करणारा अशा त्रिवर्गांनीं एकत्र एकांतीं बसून, कार्याच्या उद्देशाचे प्रश्न–प्रश्न करणाराकडून करवून-तुमच्या अंगांत संचरणारी देवता जें तुमच्या तोंडून वदवील तें लेखकानं लिहून घ्यावं. आणि नंतर तीच आमची आज्ञा

अशी खात्री बाळगून, वर्तन करावं. सांप्रतच्या संकटाचा शेवट—श्री-खात्रीनं चांगला करील! रडतोंडीच्या घाटांत पांचशें मावळ्यांसह तुक्या भिवाजीला छपवून ठेवून जिवा म्हाल्याला संनिध ठेवा आणि श्रीच्या आज्ञेप्रमाणें कार्य शेवटास पाडून विजयी व्हा. ( एकदम नाहींसे होतात. )

**शिवाजी**—काय, समर्थ गेले? अहाहा-काय ही शुभकारक वेळ! समर्थांच्या भाषणाच्या विद्युच्छक्तीनं माझं मन किती सुविचारवश करून टाकलं आहे हें! ह्या अफ्‌जल्याला ह्या प्रतापगडावर-जशास तसं-ह्या न्यायानं गारद केला कीं, विजापूरच्या तख्ताची मेघडंबरीच ढांसळल्यासारखं होणार आहे! मग आम्हां मराठ्यांच्या विजयी खड्गाला, विजापूरची बादशाही नामशेष करायला वेळ तो किती लागणार? ह्या आर्यमातेला विजापूरच्या तख्ताचं खत घातल्यावर-परमेश्वर जर आयुष्यासह सर्व तऱ्हेची मदत देईल, तर युधिष्ठिराच्या पवित्र सिंहासनाला स्पर्श करून-माझ्या देशमातेच्या वैभवी वक्षस्थलावरचा पदर दूर करण्यास पुढें सरसावणाऱ्यांचे हात छाटायला हा शिवाजी दौड करून गेल्याशिवाय कधीं राहणार नाहीं. ( पडदा पडतो. )

**अंक तिसरा समाप्त.**



# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

**स्थलः**—रडतोंडीचा घाट.

**पात्रेंः—त्रिवेंकटाचार्य** प्रवाशी वेषानें येतो.

**त्रिवेंकटाचार्य**—आमचे गारु मध्वाचार्य अवरनम्माह्नि हेळुत्ता. त्ये रामदास परुक्षा बगावा. त्ये हामी बंद्येनु. ह्ये रांडतोंडीचे घाट—संध्यावंदन योग्य. निर्झर झार्री—ह्ये स्थालीच संध्यावंदन माडबेको. चोरु करावे—भाक्षण करावे. स्नान करावे. मार्तंड आकाश मध्यान्हके आयतु. भोजन बेको. परळी जाग्रते परुक्षा करावा. प्रथम चोरु अग्नीके इट्टुबिडु. स्नान वेको. ( जातो व **तुक्या भिवाजी**—कांहीं सशस्त्र मावळ्यांसह येतो. )

**तुक्या**—कार मर्दोन्हो, म्हाराजांची आज्ञा समाजली का न्हाय? आमच्या मावळं गड्यांच्या संभरा संभराच्या तीन टोळ्यांच्या बारा टुकड्या करूनशान मागती त्येंच्या साठ केल्याति! आन् त्या समद्यानां परतापगडाच्या खडकामंदी छपून बसाया सांगितलं हाये. आपुनबी तिक्तंच मावळं गडी हाउत. ह्या रडतोंडीच्या घाटामंदी आपनालाबी तसच करूनशान हथ राखाण कराची हाये. परतापगडाप त्या मुसलमान सरदाराची आन् आपल्या म्हाराजांची भ्याट झाली म्हजी योक जंगी त्वाफ उडणार हाये! त्वाफ उडाली म्हजी पायथ्याप छपून बसल्येल शूर मर्द मावळ गडी योकदम त्या सत्रूच्या सैन्याप छापा मारनार अन् त्येंच्यातून शिल्लक न्हाउन ज्ये हक्ड दौडत येनार त्येंच्याप आपुन चौबाजूनीं हल्ला करून त्या संम्द्यास्नी गारद करनार!

**सर्व मावळे**–आन् ह्ये मर्द मंग बक्षिशी मिळवनार !

**तुक्या**–खुशीनं म्हाराज ती तुमास्नी घेनार !

**सर्व मावळे**–आन् मंग आमी सम्दं खूस व्हनार !

**तुक्या**–आन् त्येनं महाराजांचा परताप व्हाडनार ! अर पन त्यो कोन हायर त्या झऱ्याप ? ( नीट न्याहाळून ) काय इचिभन हाक्ड माइंदळ झुंजीचा वक्त आलाया आन् त्यो पगा–सवास्थ सक्लादीच्या पिशवी मंदी हात घालूनशान डोळं ताट उघडून बसलाया ! आं आन् कपाळाप यक्शे अक्राऱ्यावानी गंध कोनच्या मुल्खाचं लावलंयान्–अर त्ये बवा–त्ये बघा–हाहाहाहा-हाहाहा ! अर योकदम त्यो घाबरलान् काय ? त्येच्या त्या भाताला कुत्रं शिवलं म्हून त्यो पगा त्येच्या मागं दौडत इक्डच येत हाये. चला आपुनबी आपल्या कामाप इथुन ईरश्रीनं दौडत जाऊंया.

( जातात व डोक्याला टोपी, गोमुखींत हात, कपाळाला त्रिवेणीचें गंध, हातांवर आणि पोटावर गोपीचंदन लावलेला व घाबरलेला असा **त्रिवेंकटाचार्य** येतो. )

**त्रिवेंकटाचार्य**–चोरुं ठेवले–स्नान केले–संध्यावंदन कुल्कोंडु. श्वानपुत्र बन्नि–चोरुं मुट्टिदरु–मडिमाड बेकु. धर्मभ्रष्ट आयतु. चोरुं बिसाड बिडि. नूतन ठेवणें–तंडुल अक्कि इल्ला. बाजार दूर आगिंते. द्रव्य इल्ला. ( चहूंकडे पाहून ) देव बघितले विष्णवेनमः विष्णवेनमः माडबेक्कु ! मनुज भघितले प्रायश्चित्त माडबेक्कु ! मनुज नोडल्लिल्ला प्रायश्चित्त होइत्तु ! देव बघितले विष्णुतीर्थके चारुं शुद्ध केले ! चारुं भक्षण करावे ! परळीस जावे परुक्षा माड्वदुर्क्यं ! ( जातो व **तुक्या शिवाजी** येतो. )

**तुक्या**–म्हाराजानीं आज्ञा केल्या परमान येवस्था तर चोख झालीया ! पन ह्ये व्हनार कसं ? सत्रु अबदुल्खान म्हजी जनु माजल्येला हाथी आन् त्येच्या म्होरं आमचं म्हाराज म्हजी

योकांदी मुरगी. त्येचं सैन्य म्हजी माइंदळ लांब लचाक दाट रान आन् आमचं मावळं गडी म्हजी परसांत उगावल्येली माइंदळ झाडं. पन तीच जगदंब्येच्या किरपेनं आन् म्हाराजांच्या पुन्याईनं त्या माइंदळ सवास्त पोसल्येल्या रानाला खची करनार! योक लाकुड–तोड्या का योक दगुड–फोड्या–हालकं हालकं समदं रान त्वाडून निजावतो नि डवांगरचा डवांगर फोडूनशान जमीनदोस्त करतो! तसंच आम्हीं हाऊत. (पाहून) अर पन त्यो मघाचा बामन–त्येला वाटतंया कि आपल्याला कुनीबी पगितलं न्हाय आन् म्हून गुमान भात खात बसलाया! का नशीब हाये इचिभन! आमच्याप आला म्हजी मागान इटाळ व्हईल म्हून बोंब माराया हा का कमी करनार व्हय? कुत्रं शिवलं त्यो भात खाया येला इटाळ न्हाय, आन् धर्मासाठीं मरनाला तयार झालेल्या आमा मर्दांचा ह्या बामनानां इटाळ व्हतो. खूप हाये ह्येंचं शास्तर! (तोफेचा आवाज ऐकू येतो. तो डचकतो आणि 'मारा, रोखा, तोडा, फाडा' असं म्हणत पळत जातो व त्याच्या मागून त्रिवेंकटाचार्य घाबरत पळत गेल्यावर मुसलमानानां मारीत मावळे येतात व त्यांस मारून पाडतात इतक्यांत सर्वांग रक्तानें भरलेला आणि हातांत वाघनखें असून डोकें रक्तानें माखलेला असा शिवाजी व त्याच्या मागून जिवा म्हाल्या येतात.)

शिवाजी–वीरा, जिवा म्हाल्या, ह्या लोकीं तूं धन्य आहेस!

जिवा०–महाराज, त्या अफ्‌जुलाची केवढी शक्ति होती?

शिवाजी–कांहीं विचारूं नकोस! परस्परानां भेटण्याकरतां जेव्हां आम्हीं एकमेकांनीं हात पसरले, तेव्हां त्यानं कपटानं मला आपल्या खाकेंत दाबला–

जिवा०–त्यावेळीं कोंबडी–विक्याच्या बगलेंत लटकणारं कोंबडं आपण दिसत होतां—

**शिवाजी**—त्यानं मला बगलेंत दाबलं तेव्हां माझ्या डोळयां-पुढें अंधेरी आली, पण त्यावेळीं, तुझ्या समयसूचकतेच्या प्रकाशाचाच मला फार उपयोग झाला—

**जिवा०**—त्यावेळीं मी जर सूचना केली नसती तर ह्यावेळीं आपण इथें असे बोलत उभे राह्यलोंच नसतों—

**शिवाजी**—तुझं म्हणणं खरं आहे. तुझ्या सूचनेचा आवाज ऐकल्याबरोबर ही वाघनखं आपोआप त्याच्या कोथळ्यांत घुसली—

**जिवा०**—पण तितक्यांत त्यानं आपल्या डोक्यावर एक जंगी वार केला—

**शिवाजी**—पण शेवटीं कोथळा फुटून तोच ठार झाला—

**जिवा०**—आणि आपण विजयी झालों.

**शिवाजी**—ह्या आजच्या तुझ्या कामगिरीबद्दल तुला बक्षीस द्यावं तेवढं थोडं आहे. मी तुझे ह्याबद्दल जे आभार माना-यला पाहिजेत त्यांच्या दुपटीची चौपट करून जरी मानले, तरी ते पुरेसे होणार नाहींत.

**जिवा०**—महाराज, ह्या गोष्टींत आभार मानून जरी अगणित बक्षीसं आपण मला दिलीं तरी—'जिवा होता म्हणूनच शिवा वांचला' हे माझे शब्द सर्वांवर कळस झाल्याशिवाय राहतील काय?

( शिवाजी हे शब्द ऐकून डचकतो व रामदास एकदम ओरडत पडद्याबाहेर येतात. )

**रामदास**—काय, अठरा—पगड जातींत माजलेल्या स्वार्थसाधू द्वैताला लाथ मारून—अद्वैताचं मराठी राज्य आणि महाराष्ट्रधर्म स्थापन करणाऱ्या माझ्या शिवबाला—त्याचा नोकर—मशालजी—ऐनवेळीं भाषणांत कुंठित करून आडवतो काय? बस्स्—ह्या-पैकीं घातकी तटाचा विध्वंस आतांच्या आतांच झाला पाहिजे. अरे बघता काय? ह्याला तोफेच्या तोंडी उडवा!

**शिवाजी**–बस्स्–हेच शब्द खरे.

**जिवा०**–हा निव्वळ अन्याय होत आहे!

**रामदास**–ऐरे बदमाष–तोंड बंद कर! आपल्या अकलेचे तारे कोणापाशीं चमकावतोस? हरामखोरा, खाल्या घराचे वासे मोजतोस? बढाईखोरा, मागले दिवस विसरून तालेवारीच्या गोष्टी आणि बढाईची उत्तरं कोणापुढें करतोस? थू तुझ्या सेवाधर्मावर! अरे पागल, अशा तऱ्हेनं धन्याला आडवतोस? रौरव नरकांत जाशील. बेअकलीपणाच्या गर्वाशीं मैत्री करून महत्वाकांक्षेचा शिरपेच कोणापुढें चमकावतोस? शिवाजी राजा सारख्या महान समर्थ धन्यापुढें–सेवकाच्या ज्ञानाचा प्रकाश सूर्य–प्रकाशांतल्या दिवटी प्रमाणें असतो हें तुझ्या लक्षांत नाहीं? मूर्खा, मी होतों म्हणून प्रसंग पार पडला असं म्हणायला आजपर्यंत कोणाच्या अन्नावर वांचलास? सूर्याचं उसनं ऐश्वर्य घेतलेला चंद्र कधीं प्रखर प्रकाश पाडतानां दृष्टीस पडला आहे काय? प्रकृति असेल तरच प्रत्ययाचा उपयोग! नाहींतर त्याला विचारतो कोण? आमचा शिवराजा आहे म्हणूनच तुम्ही नोकरलोक आहां. तुम्हीं पाजी सेवक, पोटासाठीं धन्याची सेवा करून, ऐन प्रसंगीं सापासारखा महत्वाकांक्षेचा विषारी गरळ धन्यावर फेंकतां; पण समानदर्शी न्यायदेवता त्याचं जहर तुमच्याच देहांत पसरवते. धन्याच्या गरीब स्वभावाचा फायदा घेणारे असले सेवक जर वेळींच कतल केले नाहींत, तर अमावास्येच्या आनंदाच्या दिवशीं केतू जसा सूर्याला छळतो तसे हे धन्याला छळतात. तिरंदाजानं सोडलेल्या इच्छित बाणाप्रमाणें चाकरानं धन्याची सेवा केल्यास त्यांत वाखाणणीची जरूर काय? सच्चेपणाचा बुरखा घेतलेली लबाडी न्यायापुढें जशी नागवी होते त्याचप्रमाणें न्यायाच्या पायावर उभारलेल्या महाराष्ट्राच्या इमारतींत–फितवेखोर, अपमतलबी आणि ' जिवा होता म्हणूनच

शिवा वांचला ' असे उद्गार काढणारे निमकहराम सेवक वेळींच छाटले पाहिजेत. शिवबा, बघतोस काय? ह्या नीचाला देहांत प्रायश्चित्त दे!

**शिवाजी**–आज्ञा प्रमाण!

**जिवा०**–माझ्यसारख्या नीचाला देहांताची शिक्षा अगदीं योग्य आहे. माझ्या देहांतानं महाराजांच्या इतर नोकरांस सेवाधर्माचा उत्तम धडा मिळणार आहे. हेंच मी माझं शेवटचं स्वामीकार्य समजतों. म्हणून सांगतों–माझे मित्र मावळे मर्दानों, हा माझा धडा लक्षांत ठेवा. तुम्हीं सेवक म्हणजे निव्वळ गारगोट्या आहांत. तुमच्या अधिकाऱ्यांच्या आज्ञेचा तडाका तुमच्यावर बसल्याशिवाय, वरचढपणानं तुम्हीं आपलं गुप्त तेज कधीं प्रगट करूं नका. मी यःकश्चित् महाराजांचा मशालजी होतों. महाराजानां जरूर नसतां मी आपल्या बढाईची दिवटी पाजळल्यामुळेंच ह्या देहांतल्या पंचप्राणांची ज्योत आज मी आपल्या हातानं विझवून घेत आहें. पण ह्याबद्दल दुःखाऐवजीं मला आनंदच होतो आहे. आपल्या देशाच्या आणि धर्माच्या शत्रूचं पारिपत्य करण्याचा महाराजांचा धडा जसा तुम्हीं आज गिरवीत आहांत–त्याचप्रमाणें–सेवाधर्माच्या धड्यांत चूक न होऊं देण्याकरतां माझ्या चरित्राची तसबीर सदोदीत आपल्या डोळ्यांपुढें ठेवावी अशी माझी तुम्हां सर्वांना शेवटची विनंती आहे. माझ्या देशबांधवांनां सेवाधर्माचा धडा देण्याकरतां आज मी आपला देह गमावीत आहें–ह्याबद्दल जी मला प्रौढी वाटत आहे त्याबद्दल स्वामी मला क्षमा करोत. मी तोफेच्या तोंडीं जाण्याला सिद्ध आहें.

**शिवाजी**–तुक्या भिवाजी, चला याला घेऊन. हुकुमाप्रमाणें काम बजावा. तोफेला बत्ती देण्याच्या वेळीं ह्याला जर थोडंसं बोलायचं असेल तर आमची परवानगी आहे.

**जिवा०**–हा स्वामीसेवादक्ष नोकर उभयतां स्वामींस अखेरचे दंडवत घालतो आहे–ह्याला आशीर्वाद असावा. ( नमस्कार घालतो. )

**शिवाजी**–वीरा, पुढच्या जन्मींही ह्या शिक्षेची आठवण ठेव.

**रामदास**–जा–आपल्या धन्याच्या शब्दांचं चिंतन करीत जा. त्यांतच तुला मोक्ष मिळेल.

( **रामदास** व **शिवाजी** यां शिवाय सर्व जातात. )

**रामदास**–शिवबा, तुमचा एक अत्युत्तम सेवक आज दुनियेतून नाहींसा होत आहे, पण उपाय काय? यजमानाच्या पश्चात् यजमानाच्या घोड्यावर आसन ठेवणारा किंवा देखत मिशी पिळणारा नोकर–हें रस्त्यांत–प्रेतावरचं पडलेलं अशुद्ध व अस्वच्छ असं नागवेलीचं पानच होय! रक्तवृद्धीचे वगैरे सर्वोत्तम गुण जरी त्याच्या अंगांत असतात, तरी वेळपरत्वें ते गुण दूषित झालेले आहेत असं समजून–दुसऱ्या कोणीही तें सेवन करूंनये म्हणून त्याला ज्याप्रमाणें जागच्याजागीं टांचेनं चिरडून टाकावं लागतं त्याचप्रमाणें ह्या अशा नोकरांना माफी केली असतां वेळीं फितुरीचा अगर अप्पलपोटेपणाचा स्वराज्याला रोग होतो.

**शिवाजी**–समर्थांच्या दासाचा दास सुद्धां म्हणवून घेण्याची माझी योग्यता नाहीं. आज जें कांहीं घडलं तें सर्व समर्थांच्याच कृपेनं घडलं आहे.

**रामदास**–शिवबा, तूं धन्य आहेस. आमच्या कृपेनं काय होणार? तूं जन्मजन्मांतरीं श्रीची सेवा बहुत केली आहेस. तूं खरा पुण्यार्थी आहेस! मागील जन्मीं तूं भागीरथीच्या सत्तावीस कावडी रामेश्वरास नेऊन अभिषेक केला आहेस.

**शिवाजी**–समर्थांच्या म्हणण्याचा अर्थ समर्थांसच कळणार! वानराच्या हातून लंका घेववली तशी माझ्या हातून सेवा घेत आहेत.

**रामदास**—राजा, आम्हांला कृष्णातीरीं येण्याचं कारण तुम्हींच आहां. श्रीच्या संकल्पाप्रमाणें तुम्हाला तुळजा भवानीचा वरही आहे. तेव्हां आतां कशाचीही काळजी न धरतां, व्यवहार करता तसाच करावा. ज्या बुरजावर अबदुल्याला चीत केला आहे त्याच्याच खालीं त्याचं थडगं करून त्या बुरुजाला अफ्जुल् बुरूज असं नांव द्यावं. कारण आजची घडलेली गोष्ट ही इतिहासांत फार मोठ्या अक्षरांत 'जशास तसं' ह्या सदरांत लिहिली जाणार असून, प्रतापगडाचं स्थलमहात्म्यही तुमच्या कर्तबगारीनं चिरस्मरणीय झालं आहे.

**शिवाजी**—आज्ञेप्रमाणें करतों.

**रामदास**—ह्या अबदुल्यानं वाटेंत—जेजूरीचा खंडोबा, पंढरपूरचा विठोबा, तुळजापूरची भवानी वगैरे जीं देवस्थानं भ्रष्ट केलीं आहेत त्यांची पुन्हां स्थापना करवा. त्या रोषावरून मुसल्मानांच्या मशीदी उध्वस्त करण्याचं मात्र दुष्कृत्य करूं नका. कारण ज्याचा त्याला धर्म स्वत:च्या हृदयाप्रमाणें प्यारा असतो. दुसऱ्याच्या धर्मांत आपण हात घातला असतां आपलाच धर्म समानदर्शी न्यायदेवतेच्या संमतीनं आपल्याला पदभ्रष्ट करतो. आमचा महाराष्ट्रधर्म आणि राज्यसंस्थापक शिवाजी राजा—यवनानां देखील किती मान देत होता ह्याबद्दलच्या पुराव्यांत ही गोष्ट आधिष्ठांनीं बसणार असून—आपल्या राज्यांतल्या मशीदींनां तुम्हीं चालू केलेलीं उत्पन्नं तुमच्या वैभववृक्षाला वाढण्याला राजमार्ग दाखवण्याकरतां, परमेश्वर—स्वरूप अल्लाची बंदगी बजावीत बसलीं आहेत. असो. आतां तुम्हांला पुढची तयारी केली पाहिजे. विजापुरीं फक्त राहिलेला शिद्धीजोहार शिपाई तुमच्यावर चालकरून येण्याला थांबणार नाहीं. त्याचा फडशा मोठ्या युक्तीनं केल्यावर तुम्हांला कर्नाटक

आणि विजापूरवर स्वाऱ्या करायच्या आहेत. मिरजेच्या मुसलमान सुभेदाराप्रमाणें रस्त्यावरचे एकंदर अकरा सुभेदार रामभक्त करून सोडले आहेत. त्यांची तुम्हांला ससैन्य मदत होणार असून, श्रीतुकाराम महाराजांनीं तयार केलेले धर्माचे अभिमानी असे पंढरीचे शूर वारकरी–शिपायी, तुम्हांला एकजुटीनें उपयोगी पडणार आहेत. आमचे कुबड्यावाले किरमिजी रामदास–शत्रूच्या राज्यांत फितुरी करीत हिंडत असून, कोकणांतल्या प्रमाणेंच त्यांनीं दक्षिणेंत, भिक्षेवर जमवलेल्या धान्यांची कोटारं, तुमच्या सैन्याला मदत करण्याची वाट पहात आहेत. ह्या सर्वांचं तुमच्या शेलक्या मराठी सैन्याला उत्तम साह्य होणार आहे. म्हणून स्वस्थ न बसतां पुढची व्यवस्था करा.

**श्लोक.**

जया चक्षुनें लक्षितां लक्षवेना ॥
भवा भक्षितां रक्षितां रक्षवेना ॥
भयाभीत तो अक्षयीं मोक्ष देता ॥
दयादक्ष तो साक्षिनें पक्ष घेता ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ ! ! (जातात.)

---

## प्रवेश दुसरा.

**स्थलः—परळीगडापुढला भाग.**

वामन पंडित स्तोत्र म्हणत येतात.

रामदास स्तोत्रम् !

यं प्राहुः शिवनिर्विशेषमनिशं ब्रह्मेति वेदांतिनः ॥
कर्तारं कुशलाः प्रमाणपटवः सद्युक्तिभिस्तार्किकाः ॥
अन्ये स्वाभिमतं वदंति बहुधा सांख्याः प्रधानंपरं ॥
तस्मै सद्गुरवेति संतु नतयः श्रीरामदासाय मे ॥ १ ॥

लोकानामिह संसृतावभिनिमग्नानामसंचेतसां ॥
तेषामुद्धरणाय येन परमां प्रज्ञावधिष्ठाय वै ॥
आद्यंतासरमागतेन निकृतः सारोवतारोह्ययं ॥ तस्मै० ॥
वैराग्येकृतवानतीव जगतां तादृक् प्रवृत्यैव यः ॥
कान्तारान्तर संचरैक निरतौ नीता कियद्वासराः ॥
पश्चाल्लोकदयापरेण हि पुरात्तापंचसंसेविता ॥ तस्मै० ॥
नानादेव महामहा विरचिता स्तीर्थाटणान्यादरा ॥
दंतः प्रेमभरेण येन बहुधा मूर्तिप्रविष्ठापनाः ॥
ग्रन्थाश्चापि जगत्प्रबोधपटवः सत्सारमाशांसिनः ॥ तस्मै० ॥
यः संमंगल मंगलं वरमनं सर्वादिभूतं परं ॥
यत्सानिध्यमवाप्य वाक्प्रभृति सेद्वाजातमा वर्तते ॥
अंतभ्रांत दुरागमः किमिति हो वाक्पार दूरे स्थितः ॥ तस्मै० ॥

अशी ज्यांची योग्यता त्यानां समर्थ हें नांव अगदींच योग्य आहे. सर्व भरतखंडांत—मनाचं समाधान करणारे सध्यां—एक श्रीतुकाराम किंवा दुसरे श्रीरामदास—हेच कायते आहेत. विद्येच्या जोरावर सर्व आर्यावर्त पादाक्रांत करून चहूं-कडून जयपत्रं मिळवली; परंतु मनाचं समाधान करून, ब्रह्माची जोड अखेरीस श्रीतुकाराम महाराजांच्या सांगण्या-प्रमाणें श्रीसमर्थांकडूनच मिळाली आणि आतां हा आत्मा कसा ब्रह्मानंदांत निमग्न झाला आहे. ह्या दोन्ही साधूंची उत्पत्ती, जरी दोन आर्यांपासून स्वतंत्र वर्णांत झाली आहे, तरी ती लौकिक दृष्टीची आहे. पारमार्थिक नजरेनं हे सहोदरच्च आहेत. दोघेही स्वधर्म आणि स्वदेशभक्त विरक्त खरेच! सैनिकांप्रमाणें—शिधा, लोटा, तवा, पितळी—पडशींत पाठीशीं बांधून—ऐक्यकारक पांडुरंगाची भगवी पताक खांद्यावर फडकावीत आणि गळ्यांत तुळशीमाळा व मस्तकावर गोपीचंदनाचा वैकुंठीचा टिळा मारून, श्री तुकाराम महाराजांचे अनुशासित

स्वधर्माचे शूर शिपाई, समाजाला व्यवस्थित स्वरूप देण्याकरतां, वितंडवादी लोकांवर मुखानं अभंगांचे कोरडे फडकावीत, तांड्या तांड्यानं जाऊं लागले म्हणजे—तुकोबारायांच्या अभंगवाणीचा अभंग जयजयकार ह्या कानांत घुसून—अंधपरंपरेच्या रूढींस झुगारून देण्यास हें मन सज्ज होतं आणि श्रीसमर्थांच्या शिष्यांचा स्वातंत्र्यद्योतक भगवा तांडा—वीररसप्रचुर असे खडखडीत स्वदेशाभिमानाचे श्लोक म्हणत—यवनांच्या मुलुखांत कुबड्या घेऊन घुसूं लागला म्हणजे—राक्षसांचा विध्वंस करणाऱ्या रामायणांतल्या वानर-सेनेची आठवण होऊन—स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं माझं हत्यार धरण्यास—मी जीवन्मुक्त झालों असतां ही—माझ्या हाताचीं हीं बोटं उच्छृंखल होतात. असा ह्या ब्रह्मानंदांत निमग्न होणारा आत्मा जर संसारांत—स्वदेशबांधवांसाठीं माघारा येऊं पहातो, तर—होत असलेल्या हालांचा प्रतिघडि अनुभव घेत असलेल्या माझ्या देशभगिनी आपलीं बोटं कडकड मोडून—आपल्या भर्त्यांनां भागूबाईपणाची शरम उत्पन्न करण्यास कधीं तरी माघार घेतील काय? ( पाहून ) अरे पण ह्या दोन मूर्ति कोणाच्या इकडे येत आहेत. विजयजिगीषेनं त्रस्त होऊन रेड्यासारखे सुस्कारे टाकणारे हे दोघे कोण बरं असावे?

( दोन ज्योतिषी येतात. )

**दोघे ज्योतिषी**—नमस्कार हो भट्टजी बोवा!

**वामन**—नमस्कार!

**१ ज्यो०**—तुम्हीं सज्जन गडावरच समर्थांच्या सेवेंत असतां काय?

**वामन**—होय!

**२ ज्यो०**—मग आतां समर्थदर्शन होईल का?

**वामन**—कां बरं? कांहीं जरूरीचं काम आहे वाटतं?

१ ज्यो०–तुम्हांला काय? विचारल्या प्रश्नाचं उत्तर द्या अन् चट् मोकळे व्हा!

२ ज्यो०–हो–दुसरं काय तर! ज्योतिष्यानं मुहूर्त सांगितला कीं चालूं लागतांना दक्षणा देऊन मोकळं व्हावं!

**वामन**–अहो, पण मंगळाच्या गृहीं शनी असून रवीवर जर त्याची दृष्टी असेल तर त्याचा परिणाम काय होतो तो मी का आपल्याला सांगायला पाहिजे?

१ ज्यो०–तुम्हीं ज्योतिष पढलेले आहांत वाटतं?

**वामन**–मुख्य मुख्य अंगं पढलों आहें.

२ ज्यो०–मग ह्या देशाला खरं स्वराज्य केव्हां मिळेल तें सांगा पाहूं?

**वामन**–ह्याला प्रथम दुष्ट ग्रहांच्या शमनार्थं दानं, नंतर जप आणि मागून यज्ञ–इतक्या क्रिया झाल्यावर एका घटकेंत स्वराज्य-प्राप्तीचं निशाण फडकेल.

१ ज्यो०–ग्रह कोणचे वाईट आले असून त्यांनां दानं कोणचीं केली पाहिजेत?

**वामन**–प्रथम उच्च वर्ण ब्राह्मण हे ह्या गोष्टींत दुष्ट ग्रहांचं वर्तन करूं लागल्यामुळें त्यांनीं धरलेल्या हट्टवादीपणाच्या बलिष्ट रूढीशास्त्राचं चालूं रणयज्ञास प्रथम दान करून, नंतर समर्थांच्या महाराष्ट्रधर्माची त्यांस दीक्षा दिली पाहिजे!

१ ज्यो०–बरं पुढें आपलं ज्योतिष काय वर्तवतं आहे?

**वामन**–पुढें क्षत्रिय वर्गाचं कुशल त्या ब्राह्मणांनीं चिंतण्या करतां त्यांच्या हातांत जी द्वैताच्या मेरुमण्याची माळ असेल ती काढून घेऊन अद्वैताची दिली पाहिजे—

२ ज्यो०–आणि तो जप संपल्यावर यज्ञ केला पाहिजे नाहीं का?

**वामन**—अलबत्–अहंपणाचं यजन आवडणारा यज्ञ अखेरीस झालाच पाहिजे.

१ ज्यो०–इतकं झालं कीं, स्वराज्य ?

**वामन**—यांत काय शंका !

२ ज्यो०–ही ज्योतिष वर्तवण्याची पद्धत कोणच्या ग्रंथांत सांगितली आहे ?

**वामन**—अद्वैत–ज्योतिष–मीमांसेंत !

१ ज्यो०–हा ग्रंथ पठण केल्याला आपल्याला किती दिवस झाले ?

**वामन**—तीन महिने.

१ ज्यो०–अरेवाः–अगदीं ताजंच अध्ययन आहे म्हणायचं यांचं ? बरेच्च तरतरीत विद्वान आहेत बरं का ?

२ ज्यो०–बरं तीन महिन्यांपूर्वीं तुमचा कसला अभ्यास चालला होता ?

**वामन**—श्रीसमर्थांच्या आज्ञेवरून श्रीशैल पर्वतीं कर्दली वनांत अवधूत मूर्तीच्या सेवेंत होतों. तिथें नित्यानित्य विवेकाचं अध्ययन सुरू होतं.

१ ज्यो०–मग त्याचा कंटाळा आला म्हणून हा नवा विषय घेतलात वाटतं हातीं ?

**वामन**—छेः छेः ! अवधूत मूर्ति समाधिस्त झाले म्हणून इकडे आलों.

२ ज्यो०–त्यापूर्वीं कुठें होतां ?

**वामन**—त्यापूर्वींचा माझा इतिहास फार मोठा आहे ! वेळ असल्यास सांगतों !

१ ज्यो०–चला हो आपण जाऊं या ! इतिहास कसले ऐकतां !

२ ज्यो०–तुमचं नांव काय हो ?

**वामन**–ह्या देहाला लौकिकांत वामन प
कऱ्हाडकर असं म्हणतात; परंतु पारमार्थिक द्द
नाहीं आणि सर्व आहें.

( दोघे ज्योतिषी त्याच्या पाया पडतात. )

**वामन**–अहो तुम्हीं उभयतां राजज्योतिषी
ख्यानं आपली क्षमा मागायची तें बाजूला राहून
आपण मागायला लागलांत तर सुरूच्या झा
सौंदर्य बांकदार कमरेनं गेलं म्हणून बोरीच्या
बसायला नकोका ?

**१ ज्यो०**–पंडीत महाराज, माफी असावी
त्याला न ओळखतां आपली चेष्टा केली याबद्दल

**वामन**–काय, तुम्हीं माझी चेष्टा केलीत ?
कळली नाहीं, तरी ती तुम्हीं केल्याचं तुम्हींच
आहांत. ह्यावरून, हा तुमच्यांतला व्यर्थ अ
द्वैतभाव स्पष्ट होतोना ?

**२ ज्यो०**–पंडित महाराज, पुरे आतां ! समश
ब्रह्म उडवणारे आपल्यापुढें असतांही ज्यानां क्रू
मानाचं रूप धारण केल्याशिवाय आपली खात्री
नाहीं, त्या सर्व आर्यावर्तांत जयपत्रं मिळवले
आम्हीं शब्दवादांत कितपत टिकणार ?

**१ ज्यो०**–आम्हीं दोघेही श्रीशिवाजी महार
ज्योतिषी असून, महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव युवर
यांच्या जन्मग्रहांबद्दल आमच्यांत वाद पडलेला
त्यांचं वय सहा वर्षांचं झालं असून, सध्यांच्या त्य
इतउत्तर त्यांच्या पासून त्यांच्या वडलांच्या
येऊन ते स्वतः व्यसनाधीनतेंत अखेरीस सर्वस्व
माझं मत आहे.

**२ ज्यो०**–पापी ग्रहांवरून व इतर ग्रहांवरून त्यांच्यापासून त्यांच्या वडलांस कांहीं एक इजा न होतां ते पालथे उपजले आहेत-तेव्हां शत्रूला पालथा घालतील असं शास्त्रप्रमाणांवरून सिद्ध करतां येतं.

**१ ज्यो०**–माझ्याही म्हणण्याला शास्त्राधार पूर्ण आहे.

**वामन**–बरं मग पुढें काय?

**१ ज्यो०**–ह्याच तंट्याचा निकाल श्रीसमर्थांच्या मध्यस्तीनं आपल्याकडून लावून घेण्याकरतां आम्हीं आलों आहों.

**वामन**–कोणाच्या, माझ्याकडून? वा: योग्य! त्रिकालज्ञानी समर्थांच्याशिवाय ह्याचा निकाल लागणं नाहीं. फार तर आम्हीं गणीत करून सांगूं; परंतु ताळा बघायला समर्थांचीच शक्ति पाहिजे.

**२ ज्यो०**–कसंही करून आमची मुद्याशीं गांठ घाला म्हणजे झालं!

**वामन**–चला तर. ( जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

**स्थल**–परळीगड.

**पात्रें**–त्रिवेंकटाचार्यामागून रामदास ( रडत ) व कल्याण येतात.

**त्रिवेंकटाचार्य**–ह्ये रामदासस्वामी वैष्णव–हामी वैष्णव! हामी तसमुद्रांकित-ह्ये-अवर इल्ला! स्वयंपाक माडिद्येनें पात्र बळसुकोंड्य! स्वामी बद्रु! तुप्प वन्नु बळशिद्र! पात्र मुट्टिदरु! भोजन भ्रष्ट आयतु! पात्र दुसरा मुट्टिदरु-भोजन माडुदिल्ला.

**कल्याण**–समर्थांनीं इतकं श्रमी कां व्हावं?

**रामदास**–अहो, ह्या ब्राह्मणानं आपल्या हातानं श्रम करून स्वयंपाक केला, पात्र वाढून घेतलं आणि तूप वाढतांना त्या

पात्राला आमचा स्पर्श होऊन तें विटाळलं. त्यामुळें ह्या बिचाऱ्या ब्राह्मणाचं भोजन अंतरलं! केवढा हा माझा अपवित्र देह! एवढ्याच करतां मला रडूं येतं!

**कल्याण**–महाराज, आपण श्रमी होऊं नये. ब्राह्मणास पुन्हां साहित्य देतों. ते पुन्हां चरू उतरून भोजन करतील!

**रामदास**–बापहो, ब्राह्मणाला स्वयंपाक करून भोजन करण्याला चार घटका लागतील, एवढ्याकरतां श्रमी होत नाहीं; परंतु श्रीरघुपतीनं हा देह इतका अपवित्र कां उत्पन्न केला म्हणून दुःख होतं.

**कल्याण**–आज हे काय उद्गार निघताहेत?

**रामदास**–कल्याणस्वामी, सर्व प्राण्यांचे देह अपवित्रापासूनच उत्पन्न होतात; परंतु हा देह कुत्र्याच्या देहापेक्षांही आज अशुद्ध ठरला आहे. म्हणून मोठमोठ्यानं रडूं येतं. बरं तें आमच्या स्पर्शानं विटाळलेलं अन्न विष्णुतीर्थानं सुद्धां शुद्ध होत नाहीं. तेव्हां आतां हा असा अपवित्र ठरलेला देह ह्या जगांत तरी राहण्यास योग्य कसा होईल?

**कल्याण**–महाराजांनीं आज हें काय मांडलं आहे?

**रामदास**–ह्याचा अर्थ त्या आचार्यांनां विचारा. ते ब्राह्मण म्हणजे प्रत्यक्ष भूदेव. त्यानीं रडतोंडीच्या घाटांत कुत्रं शिवलेला भात विष्णुतीर्थानं शुद्ध करून खाल्ला होता कीं नाहीं? हें त्यांनाच विचारा! म्हणजे माझ्या बोलण्याचा अर्थ तुम्हांला कळेल.

**त्रिवेंकटाचार्य**–( नमस्कार घालून ) अपराध झाले. वदन कृष्ण करते, मुखांत मारते–पादूकमारणें–कपाळमोक्ष करणें. शिक्षाकरणें–पापी रक्षा करावा. माफी मांगते–समर्थनाम योग्य झाले! उडपी गारै मध्वाचार्य परुक्षा भघाला धाडले–परुक्षा झाले! नानु पापी! क्षमस्व बेकु! टुबत भाळा कष्ट आयतु! नानु होगुल्येने–आतां हामी येत्ये.

**रामदास**–केवढा चमत्कार आहे पहा—सर्व बाजूंनीं वठत चाललेल्या ह्या आमच्या आर्यवृक्षाच्या फळांची सांप्रतची स्थिति किति चमत्कारिक झाली आहे! शत्रूचा निःपात करून, स्वदेश आणि स्वधर्म–रक्षणाकरतां ज्यांनीं आपलीं शिरं तळहातावर घेतलीं आहेत आणि ज्या शेतकऱ्यांवर आम्हीं पोटं भरतो–त्या आमच्या मूळांच्या गळ्यासह ऐक्यवृद्धींत सुखानं ठेवणारा आमचा खरा वैदिक धर्म बाजूला राहून 'शास्त्रात् रूढि र्बलीयसी' ह्या तत्वावर खोट्या मार्गांचंच स्तोम सध्यां सर्वत्र माजलेलं दिसताहे. मुद्दाम कडू कारलं खाऊन जिभेची रुची बदलण्यासारखंच हें कृत्य नव्हे का? सोंवळ्या–ओंवळ्याच्या बंडाळी संबंधानं तर विचारूंच नका. अहो–जिथें आपलं असं म्हणायला कांहींच राह्यलं नव्हतं–सर्वव्यापी ईश्वर आहे असं तोंडानं बडबडत असतां, गळ्यांतल्या डबींत अगर संपुष्टांत देवाला कोंडून ठेवण्याच्या योगानं जे स्वबांधवांसह शत्रूकडून सर्वस्वी कैद झाले-त्या सर्व गोष्टी छाटून टाकून, खऱ्या धर्माचं स्वराज्य स्थापन करण्यास शिवाजी–मार्तंडाचा उदय झाला असून–वृद्ध मार्तंडाच्या योगानं सांवली प्रमाणं दूर पळालेलं तुमचं वैभव आज तुमच्या जवळ जवळ येऊं पहात असतां, अद्याप तुम्ही स्पर्शास्पर्शासारख्या कःपदार्थ गोष्टींच्या उच्चारानं द्वैतभाव आणि अहंमन्यता सोडीत नाहीं ह्याला काय म्हणावं? देह हा मूळचा अमंगळ आणि विटाळाचा असतां, त्याला शुद्ध करण्याकरतां बाह्योपचार करता–सक्षौर प्रायश्चित्तं देतां आणि शूद्रादिकांचा विटाळ झाला असतां, पाप मानून स्नानं करता! ह्यानंच आमच्यांतला ऐक्यभाव नष्ट झाला आहे. ह्याचमुळें ब्राह्मणांनां आपमतलबीपणाचा डाग लागला आहे. परंतु सध्यां ब्राह्मण तरी खरे आहेत काय? वेदघोष करणारे ब्राह्मण म्हणजे निव्वळ प्रतिध्वनिवाहक यंत्रं आणि

पुराणिकबोवा म्हणजे काय? पुराणांतलीं वांगीं पुराणांतच. मुंडनादि बाह्योपचारांनीं शुद्ध केलेला देह पुन्हां अपवित्र होणारच आणि पुन्हां त्याच परंपरेच्या उपचारांनीं तो शुद्ध करीत बसण्यापेक्षां अंतःकरणाच्या शुद्धतेकडे जर लक्ष दिलं, तर तिथेंच द्वैताचा खून होणार आहे. परंतु स्वार्थाचे पिढीजाद वारस बनलेले लोक इकडे लक्ष कशाला देताहेत! सध्यां माजलेला सोंवळ्याचा बंडावा किती मूर्खपणाचा आहे पहाः—

**अभंग.**

अस्थिचा विटाळ होतां स्नान केलें ॥
चुडे दांतावले कासयासी ॥ १ ॥
आचमन करावें शूद्राच्या विटाळें ॥
हाटाचे चौढाळे कोण जाणें ॥ २ ॥
नदीचे प्रवाहीं आंत पाहों नये ॥
स्नानसंध्या होय अग्रोदकीं ॥ ३ ॥
ओलें चर्मीं दूध होत आहे हिंग ॥
स्वयंपाकीं सांग सेविताती ॥ ४ ॥

तेव्हां बापहो,—

ऐसें कैसेंरे सोंवळें ॥ शिवतां होतसे ओंवळें ॥
स्नान—संध्या टीळे माळा ॥ पोटीं क्रोधाचा उमाळा ॥
नित्य दंडीताती देहो ॥ परी फीटेना संदेहो ॥
नित्य नेम खटाटोप ॥ मनीं वीषयाचा जप ॥
वांहे केली झळफळ ॥ देहबुद्धीचा वीटाळ ॥
रामदासी दृढभाव ॥ तेणेंवीण सर्व भाव ॥

कल्याण— **श्लोक.**

धरा श्रीधरा त्या हरा अंतरातें ॥
तरा दुस्तरा त्या परा सागरातें ॥
सरा वीसरा त्या भरा दुर्भरातें ॥
करा नीकुरा त्या खरा मत्सरातें ॥

जयजय रघुवीर समर्थ! (जातात.)

---

## प्रवेश चवथा.

**स्थळः**—सातारच्या राजवाड्यांतील महाल.

**पात्रें**:—जिजाबाई आणि शिवाजी.

**शिवाजी**—आई, आमच्या सारख्या मुलांना जन्म देऊन, देशमातेची एकनिष्ठपणानं सेवा करण्याच्या युक्त्या सांगणाऱ्या अनेक आया, जर ही भरतभूमी उत्पन्न करील, तर महाराष्ट्र भाषेच्या शब्दवृक्षाचं 'परकीयसत्ता' हें बांडगुळासारखं शब्द-फळ ताबडतोब गळून पडेल.

**जिजाबाई**—बाबा शिवबा, समर्थांच्या महाराष्ट्रधर्माच्या व्याख्येप्रमाणें सर्वत्र व्यवस्था होत चालली आहे. ब्राह्मणादि वर्णव्यवस्थेंत मुख्य वर्मांचं अंजन पडत चालल्यामुळेंच समर्थांची जी-मुख्य-साम्राज्याची कल्पना-तिला आधार देण्यासच सर्व भूमीवर सध्यां वीररसाचे-स्वातंत्र्यपान देणारे झरे-ही वीरभूमी प्रसवूं लागली आहे. त्यांचे कालवे बांधून स्वदेशबांधवांनां स्वातंत्र्याच्या मंदिरांत सुखानं ठेवण्याचं जें काम सध्यां तूं करीत आहेस तेंच खऱ्या लोकनायकाचं कर्तव्यकर्म असून-त्याचमुळें तुझी इच्छा पूर्ण होणार आहे.

**शिवाजी**—माझे वडील बंधु संभाजीराव आणि वडील जर आज हयात असते तर त्यांचं केवढं साह्य मला झालं असतं! सावत्र भाऊ व्यंकोजी राजे माझ्या चालु कृत्यांत मला मदत करतील अशी फार आशा होती; पण ज्यानां वडलोपार्जित संभाळण्याची ताकत नाहीं ते नवं कसचं मिळवणार ?

**जिजाबाई**—खरंच शिवबा, चंदावरची काय हकीकत आहे ?

**शिवाजी**—फाजल, शिद्दीजोहार वगैरेंचा पराभव केल्यावर, कर्नाटक हस्तगत करून घेण्यास व्यंकोजीची मदत घ्यावी म्हणून तुम्हीं मला सांगितलं होतं! परंतु त्या कृत्यांत त्याची कितपत

मदत होईल हें अजमावण्याच्या उद्देशानं त्याला वकीलाबरोबर एक धमकावणीचा निरोप धाडला.

**जिजाबाई**–तो काय ?

**शिवाजी**–'चंदावर प्रांतींची जहागीर वडलोपार्जित असल्यामुळें योग्य न्यायाला अनुसरून आम्हांला त्यांतली अर्धी वांटणी द्यावी.'

**जिजाबाई**–मग त्यांनीं पुढें काय केलं ?

**शिवाजी**–'पुणें प्रांतींची जहागीर जशी तुम्हीं संभाळली आहे तशीच आम्हींही चंदावर प्रांतींची संभाळली असल्यामुळें हीच सरळ न्यायाची वांटणी झाली आहे' असं त्यानं उत्तर धाडलं !

**जिजाबाई**–त्यावर तुम्हीं काय उत्तर दिलं ?

**शिवाजी**–'आम्ही मुद्दल जतन करून मुद्दलाची शंभरपट शिलकेंत टाकली आहे. तसं तुम्हीं काय केलं आहे तें दाखवून योग्य वाटणीस पात्र व्हा. नाहींतर ताबडतोब अर्ध्या वांटणीची फारकत लिहून धाडा.'

**जिजाबाई**–हें ऐकून व्यंकोजी राजे संतापले असतील ?

**शिवाजी**–तो संतापून लढाईला उभा राहिला !

**जिजाबाई**–शाबास ! शिसोदे कुळांची एवढी तरी धमक त्यांनीं दाखवली !

**शिवाजी**–पुढें एकाच झडपींत तो शरण आल्यावर त्याचं राज्य जिंकून घेऊन त्याला परत बक्षीस करून दिलं आणि रघुनाथ हणमंते वकीलांना कर्नाटक प्रांतींची व्यवस्था सांगून, विजापूरकडे मोर्चा वळवला. तिथल्या तक्ताला मावळी भाल्याचा तडाका दाखवून, चौथ आणि सरदेशमुखीच्या सनदा व खंडणी घेऊन बरिदशाही पालथी

पाडून परत आलों. तों हें दुसरं दिल्लीकडचं प्रचंड विघ्न पुढें दत्त म्हणून येऊन थडकलं आहे !

**जिजाबाई**–हो खरंच–बाळ, तुझी आणि जसवंतसिंगांची भेटीची वेळ केव्हां ठरली आहे ?

**शिवाजी**–आज मध्यान्ह रात्रीं भेट व्हायची ठरली असून, दिलेरखानाला हा मुकाब्ला कळूं न देण्याचा पूर्ण विचार आहे. अवरंगजेबास भेटून, दक्षिणेच्या सुभेदारीची सनद घेऊन परत यावं आणि नंतर सबंद दक्षिणेचं स्वतःच मालक होऊन बसावं असा सल्ला मला देऊन, दिल्लीस चलण्याबद्दल जसवंतसिंग मला आग्रह करीत आहेत. माझ्या जिवाची हमी ते स्वतःच्या रजपूत बीजाला स्मरून घेण्यास तयार आहेत. शिवाय समर्थांनीं आधींच रामदास करून सोडलेला शीखांचा गुरुही त्या प्रांतीं ऐन प्रसंगीं मदत करण्यास माघार घेणार नाहीं असं त्याचं वचन आहे.

**जिजाबाई**–शिवबा, प्रत्येक गोष्टींत धीरधरून आपला आपण विचार करावा आणि सर्वस्वीं दुसऱ्यावर भरंवसा ठेवूं नये. देहाला किती जरी दुःखं झालीं, तरी न भितां काम केलं असतां अंतीं सुखच प्राप्त होतं. शत्रू आणि मित्र यांची अनेक तऱ्हेनं परीक्षा बघण्यास एकांतीं मसलत करून, मनाचा धीमेपणा राखावा. एकवार फसलं म्हणून प्रयत्न न करतां सुखांत निमग्न होऊं नये. अनेक गोष्टींचे अनेक विचार करावे. मुख्य प्रसंग चुकूं नये आणि आपण धुरीण असल्यामुळें धीर सोडूं नये. आरंभलेल्या कार्यांतलीं विघ्नं बाजूला सारण्यास जो कंटाळतो आणि बुद्धी चालवण्यास जो त्रासतो तो कुचकामाचा ठरतो. जो अंगचापल्यानं स्वतःची खबरदारी प्रकट करतो त्याचं सामर्थ्य वाढून अनेक संकटं त्याचे गुलाम बनतात.

मोठमोठे कार्यकर्ते दूर ठेवावे हें खरं, परंतु प्रसंगीं त्यांनां हातीं धरून त्यांच्यांतलं कपट शोधावं. जे मोठे विचारी तेच धक्के चपेटे सोसून आजपर्यंत ईश्वराचे अवतार म्हणून थोर कीर्तीचे होऊन गेले. आपल्या मनाला रोधून, परांतर शोधावं आणि कदाचित बदलेल म्हणून, हरघडी सावध रहावं. पाहिलेलं राज्यकारण पुन्हां पहावं, केलेलं पुन्हां करावं आणि शोधलेलं पुन्हां शोधावं. ( पडद्यांत रामदास म्हणतात.)

**श्लोक.**

**कदा ओळखीमाजि दूजें असेना ॥**
**मनीं-मानसीं द्वैत कांहीं दिसेना ॥**
**बहूतां दिशीं आपली भेट झाली ॥**
**विदेहीपणें सर्व काया निवाली ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ.

**शिवाजी**-हा शब्द समर्थांचा आहे. ऐन दोनप्रहरीं स्वारी कां आली असावी बरं? ( एक शिपाई येतो. )

**शिपाई**-माहुलीच्या रस्त्यानं करंजास भिक्षा मागून समर्थांची स्वारी कल्याणस्वामींसह भिक्षेला इकडेच येत आहे.

**शिवाजी**-आज समर्थ माझ्या घरीं भिक्षेला आले हें केवढं माझं सुदैव! जारे, परवां दिलेली मोहोरबंद थैली घेऊन बाळाजी आवजीनां इकडे येण्यास सांग.

( तो जातो व बाळाजी येतात. )

**बाळाजी**०-ही थैली आणली आहे.

**शिवाजी**-आई, ज्यांच्या कृपेनं स्वदेशबांधवांच्या सुखाकरतां अहोरात्र परिश्रम करून मुलुख काबीज केला त्यांना मला आज भिक्षा घालण्याचा सुयोग आला आहे. तेव्हां—

**जिजाबाई**-अरे, त्यांच्या कृपेची सावली त्यांसच अर्पण केल्यांत वाईट तें काय होणार आहे?

( पडद्यांत कल्याण म्हणतो )

**श्लोक.**

लपावें अती आदरें रामरूपीं ॥
भयाभीत निश्चिंत ये स्वस्वरूपीं ॥
कदा तो जनीं पाहतांही दिसेना ॥
सदा ऐक्य तें भिन्नभावें वसेना ॥

( कल्याणासह रामदास एकदम पुढें येऊन झोळी पसरतात. )

**रामदास**–ॐ भवान् भिक्षां ददातु !

**शिवाजी**–( थैली झोळींत टाकून नमस्कार घालतो ) ह्या आसनावर बसावं. ( बसल्यावर पूजा करतो. )

**रामदास**–कल्याणा, झोळींतली चिठ्ठी वाच !

**कल्याण**–( वाचतो ) 'आजपर्यंत मिळविलें तें सर्व भिक्षा म्हणून श्री समर्थचरणीं अर्पण असो.'

**रामदास**–शिवबा, तुम्हीं आज आम्हांला मोठ्या घोंटाळ्यांत पाडलंत. तुम्हांला साम्राज्याचा अभिषेक करवून स्वच्छ कीर्तिदर्शक छत्रचामरांखालीं तुमच्या नांवाचं नाणं चालू करवण्याचा जो आमचा संकल्प तो ह्यामुळें तुम्हीं बिघडवूं पहातां ! मूर्धाभिषिक्त होण्याचं सोडून तुम्हीं आपलं राज्य आम्हांला अर्पण केलंत आणि आतां तुम्हीं काय करणार ?

**शिवाजी**–परमार्थ !

**रामदास**–ब्रह्मनिष्ठ वसिष्ठ ऋषींनां श्रीरामचंद्रानं गुरुदक्षिणेदाखल वडलार्जित राज्यदान केलं, तेव्हां त्यांनीं नीति आणि राजधर्म सांगितला तो ऐका. ब्राह्मणांनीं तपश्चर्या करावी. राजानं यथान्याय राज्य करून, त्यांचं पालन करावं आणि त्यांच्या तपश्चर्येचं पुण्य संग्रहीं टाकावं. पाप आणि पुण्य यांचा संग्रह सारखा झाल्यास मनुष्ययोनी प्राप्त होते. ब्राह्मणवर्ण प्राप्त झाल्यास तो जन्म इहसौख्याविषयीं नाहीं. म्हणून तुम्हीं आम्हांला भिक्षा घातलेलं आपल्या श्रमाचं राज्य परत घ्यावं.

**शिवाजी**—आज्ञा उल्लंघन करण्याची शक्ति नाहीं; परंतु दिलेलं दान परत घेतलं असतां नीच योनी प्राप्त होते असं शास्त्रवचन आहे त्याचं कसं करायचं?

**रामदास**—पुर्वपुण्याईनं तुम्हांला राजपद प्राप्त झालं आहे आणि आमचा ब्रह्मकुलांत तुमच्याच करतां जन्म झाला आहे. आम्हांला आज तुम्हीं आपलं अर्पण केलेलं सर्वस्व आमचंच झालं, परंतु आम्हांला भिक्षेपुढें त्याचं महत्व वाटत नसल्यामुळें तें आम्हीं तुम्हांला परत बक्षीस देतों. (थैली परत देऊन) भिक्षापात्राची संभाळणूक करण्यास जसे आम्हीं लायक आहों तसे तुम्हीं राज्याची व्यवस्था करण्यास सत्पात्र आहांत. दान करणं तें सत्पात्रीं करावं. शंभरविश्वे दारिद्र्याला गजांत लक्ष्मी-सारख्या जनावराचं दान दिलं असतां तें अपात्रीं होतं. आमच्या भिक्षेचा महिमा कसा आहे ऐका—

**ओव्या.**

**नित्य नूतन हिंडावें। उदंड देशाटन करावें।**
**तरीच भिक्षा मागतां बरवें। श्लाघ्यपणें॥**
**भिक्षा म्हणजे कामधेनु। सदाफल नव्हे सामान्यु।**
**भिक्षेस जो करी अमान्यु। तो करंटा योगी॥**
**गोरक्ष, वाणिज्य, कृषी। त्याहून प्रतिष्टा भिक्षेसी।**
**कांहीं भिक्षा आहे म्हणावें॥ अल्पसंतोष असावें।**
**बहूत आणितां घ्यावें। मुष्टी एक॥**

**शिवाजी**—प्रतिनिधि ह्या नात्यानं राज्यव्यवहार करण्यास मीं तयार आहें; परंतु ह्या खटाटोपांतून सुटून आतां कांहीं तरी परमार्थ करावा अशी खरी इच्छा आहे.

**रामदास**—शिवबा, तुमच्या सारख्यांच्या पदरीं परमार्थाचं गाठोडं मुद्दाम बांधण्यास आमच्या सारख्या ब्राह्मणांचा जन्म झाला असतां, परमार्थाचा ध्यास घेऊन बसतां ह्याला काय

म्हणावं ? तुमचा जन्म होण्याचं कारण लक्षांत घ्या आणि प्रपंच साधून परमार्थ करा. सर्वसंगपरित्याग करून, परमार्थाकरतां रानांत जायला नको. तो संसारांत राहूनच होतो. मात्र पोटांत विवेक पाहिजे.

**प्रपंच सोडून परमार्थ कराल ॥ तेणें तुम्हीं कष्टी व्हाल ॥**
**प्रपंच–परमार्थ चालवाल ॥ तरी तुम्ही विवेकी ॥ ४ ॥**
**प्रपंच सांडून परमार्थ केला ॥ तरी अन्न मिळेना खायाला ॥**
**मग तया करंट्याला ॥ परमार्थ कैचा ॥ ५ ॥**
**प्रपंचीं जो सावधान ॥ तो परमार्थ करील जाण ॥**
**प्रपंचीं जो अप्रमाण ॥ तो परमार्थी खोटा ॥ ६ ॥**

संसारांत जन्म झाल्याचं सार्थक म्हणजे नित्यानित्य विवेक ! त्यानंच इहलोक आणि परलोक साधतात.

**नानावेष नाना आश्रम ॥ सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम ॥**
**जेथें पावती विश्रम ॥ त्रैलोक्यवासी ॥ ४ ॥**

एवढ्याच करतां गृहस्थाश्रमाला सर्वोत्तम आश्रम म्हणतात. त्यामध्यें स्वधर्म आणि भूतदया यांचा उत्तम अंगिकार करून आळस, निद्रा, आणि अनृत यांचा त्याग करावा. व्यवहारांत यथाशक्ति धर्मशास्त्र पाळलं म्हणजे तोच परमार्थ.

**शिवाजी**–मी गृहस्थाश्रमांत राहून आपलं राज्य चालवावं अशी आज्ञा झाली; परंतु परमार्थ साधून संसार कसा करावा ह्या विषयीं आज्ञा व्हावी.

**रामदास**–दैवयोगानं राज्यपद भोगण्यासच तुमचा जन्म झाला आहे. तेव्हां नीतीनं प्रजापालन करून सर्व जातींस एकजुटीच्या आणि एकच मानून वर्णांच्या धर्माप्रमाणें त्यांना चालवाव्या. देवस्थानं आणि गुरु यांच्या ठायीं प्रीति ठेवून, नाना प्रकारच्या लिपी लिहूं शिकाव्या. कर्ममार्ग लक्षांत ठेवून सत्समागम करावा. नाना मतांचं तर्कज्ञान बाळगून, कोणाशींही अति

विनोद करूं नये. जातीभेद न मानतां योग्यतेप्रमाणें नोकरांचा मखदूर पाहून त्यांस बढत्या द्याव्या. सैन्यावरचा सेनापति एकपत्निव्रताचा, शूर, धार्मिक आणि धाडशी असावा. तो आपल्या प्रत्याम्नाच्या योग्यतेचाच असला पाहिजे. अजरामरवत् धान्यकोश आणि द्रव्यभांडाराचा संग्रह करीत असावा. देशीभाषेला आणि कवीकारागीर वगैरेंना आश्रय देऊन व्यापार वाढवावा. परमार्थाविषयीं देह क्षणभंगुर समजून, मनोजयवृत्तीनं सर्व विषयांचा त्याग करावा. ह्याच गोष्टी प्रपंचांत राहून केल्यास, त्यांतच देहाचं सार्थक करणारा परमार्थ अनायासें घडतो.

**शिवाजी**–आजपर्यंत समर्थांच्या कृपाछत्राखालीं कांहीं स्वमतानं आणि कांहीं कारभाऱ्यांच्या मतानं राज्यकारभार केला; परंतु आतां हें राज्य आपलं झालं असल्याकारणानं–पूर्ववत् हा गाडा हाकण्यास आपली आज्ञा जरी मला भाग पाडते आहे तरी–हें राज्य समर्थांचं आहे असं जगानं म्हणण्यांतच मला अधिक कौतुक वाटेल. तेव्हां तशी कांहीं योजना झाल्यास बरं!

**रामदास**–तुम्ही जसे आमच्या इच्छेआड होत नाहीं तसं आम्हांलाही तुमच्या इच्छेच्या बाहेर जाणं नाहीं. तुमची इच्छाच आहे, तर ज्या आमच्या भिक्षेच्या झोळींतून तुमचं राज्य तुम्हांला आम्ही परत दान केलं आहे, त्याच झोळीच्या ब्रह्मचर्यव्रताचा आणि महाराष्ट्रधर्म व साम्राज्य ह्यांच्या एकीकरणाचा भगवा–झेंडा तुमच्या पवित्र पीत–राष्ट्रध्वजाच्या जागीं आजपासून रोंवा–म्हणजे तुमची इच्छा पूर्ण होणार आहे. ( झोळी देतात. )

**शिवाजी**–आज्ञा शिरसावंद्य आहे. परंतु आतां पुढें राज्यव्यवस्था कशी काय करायची ह्याची आज्ञा व्हावी. कारण,

आजपर्यंत अनेक प्रसंगांना तुडवून न्यायी रक्तपाताच्या मार्गांत स्वदेशबांधवांच्या भावी सौख्याकरतां बराच दूरवर जाऊन आपल्या इच्छेप्रमाणें सिंहासनाच्या अगदीं जवळ आलों असतां तिथें आपल्या सामर्थ्याच्या जोरानं भेडावणारा एक राक्षस येऊन उभा राहला आहे. त्याची भीति वाटते—पण धैर्याचा कंबरपट्टा कायम आहे. भवानी—मातेच्या प्रहारानं विजापूरचं तख्त घायाळ केलं खरं परंतु, उदेपूरचा राणा जसवंतसिंग आणि प्रसिद्ध लढवय्या दिलेरखां हे दोघे अवरंगजेबाकडून विजापूरकरांचा पक्ष घेऊन लक्षावधि सैन्यानिशीं चाल करून आले आहेत. त्यांना गनीमी—काव्यानं जर्जर करणं फारच कठीण झालं आहे. आज रात्रीं जसवंतसिंगांची आणि माझी दुसरी मुलाखत त्यांच्या गोटांत गुप्तपणें होण्याचं ठरलं आहे.

**रामदास**—त्यांचं म्हणणं—तुम्हीं दिल्लीस जाऊन, अवरंगजेबाच्या सल्यानं, विजापूरची बादशाही नामशेष करून, दक्षिणेच्या सुभेदारीची वस्त्रं आणि सनद घेऊन परत यावं—असं आहेना ?

**शिवाजी**—होय, असंच त्यांचं म्हणणं आहे.

**रामदास**—त्यांच्या म्हणण्याला आज रात्रींच्या भेटींत अनुमोदन द्या आणि मातोश्रींस आपल्या जागीं कारभार करण्यास सांगून, अष्टप्रधानांच्या हवालीं राज्य करा व दिल्लीच्या महायात्रेस जाण्याकरतां, युवराज संभाजीस बरोबर घेऊन, शेलक्या मावळे बहाद्दरांसह जाण्याची तयारी करा. जसवंतसिंग फितूर होणारा रजपूत नसून, तो आपल्याच कुळांतला आहे. तेव्हां त्याच्यावर भरंवसा ठेवण्यास हरकत नाहीं. परंतु अवरंगजेबाची मात्र तशी गोष्ट नाहीं. तो वचनाचा सच्चा नाहीं. त्याच्या मनांत विजापूरकरांसह मराठ्यांनां अचूक गिळायचं आहे.

म्हणून त्यानं ही युक्ति योजली आहे. तो तुमच्याशीं खात्रीनं दगलबाजी करील. आणि तोच योग जसवंतसिंगाच्या संतापास कारण होऊन, तुम्हीं दक्षिणेंत येण्यास त्याच्या पंजांतून सुटाल.

**शिवाजी**—आईनीं असंच मत दिलं आहे.

**रामदास**—ह्या खऱ्याच वीरमाता आहेत. आईसाहेब, आपले पुत्र प्रत्यक्ष श्रीच आहेत. रामचंद्रांनीं वडलोपार्जित राज्य, गुरुदक्षिणा म्हणून, वसिष्ठऋषींना दिलं; परंतु ह्यानीं स्वपराक्रमानं मिळवलेलं आम्हांला दिलं. हें उदाहरण आजपर्यंतच्या जगाच्या इतिहासांत पहिलंच असल्यामुळें मोठाल्या सोनेरी अक्षरांत लिहून ठेवण्यासारखं आहे. ह्यानां ह्यांचीच उपमा देण्याव्यतिरिक्त जशी वस्तु नाहीं तशीच ह्यानां जन्म देणाऱ्या आपण तेव्हां आपल्या उपमेला तरी वस्तु कुठें सांपडणार ? हे पुरे निश्चयी आणि खरे रामभक्त आहेत. ह्यांच्या भाषणानं दुष्ट संदेहाचं निर्बीज होऊन पुण्य प्राप्त झाल्याशिवाय राहणारच नाहीं.

**कल्याण**— **श्लोक.**

नसे गर्व अंगीं सदा वीतरागी
क्षमा-शांति भोगी दयादक्ष योगी
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा
अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ ! ! ( पडदा पडतो. )

**अंक चवथा समाप्त.**



# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

( रस्त्यावर सदाशिवशास्त्री देव येवलेकर-यज्ञोपवीताला सुरी बांधलेले आणि शिष्याच्या हातांत मशाल जळत आहे असे पालखींत बसून येतात. )

**सदाशिव**–आरोग्य हें जसं शरीराचं मुख्य जीवन तसंच ज्ञान हें मनाचं आहे. प्रीति आणि ममता हीं आत्म्याची जीवितसाधनं असून पवित्रता हें त्याचं जीवन आहे. शारीरिक सुखापेक्षां आत्मिक सुख वरिष्ठ असून, नाशवंत शरीरापेक्षांही अमर आत्मा जसा श्रेष्ठ आहे–त्याचप्रमाणें ज्ञान आणि आरोग्य ह्यां पेक्षां पवित्रपणा श्रेष्ठ आहे. त्याच्याचपासून जगांत जयप्राप्ति होते. वाराणशी क्षेत्रांत चोवीस वर्षे शास्त्राध्ययन करून एथपर्यंत त्याच शक्तीच्या जोरावर दिवसा मशाल लावून जयपत्रं मला घेतां आलीं. ह्या शिवाजीच्या राज्यांत कीर्ति वाढलेल्या रामदासाकडून एकदां जयपत्र घेतलं कीं झालं काम. हाच तो परळीगड. इथेच शिवाजीचा तो गुरु असतो. हा श्लोक कोणाचा ऐकूं येतो आहे बरं? (पडद्यांत कल्याण म्हणतो.)

**श्लोक**-

जनीं हीत पंडीत सांगूनि गेले ॥
अहंतागुणें ब्रह्मराक्षस झाले ॥
तयांहूनि व्युत्पन्न तो कोण आहे ॥
मना सर्व जाणीव सोडूनि राहे ॥

जयजय रघुवीर समर्थ. ( कल्याण पडद्याबाहेर येतो. )

**सदाशिव**–कायहो, तुम्ही कुठे असतां?

**कल्याण**–त्रिभुवनांत.

**सदाशिव**–वाः तुम्ही मोठे तत्वज्ञ दिसतां!

**कल्याण**–ही सर्व समर्थांची कृपा आहे !

**सदाशिव**–त्यांची गांठ कुठे पडेल ?

**कल्याण**–चला, आपल्याला मीच सामोरा होऊन त्यांच्याकडे घेऊन जातों.

**श्लोक**

**मना सांगपां रावणा काय झालें ॥**
**अकस्मात तें राज्य सारें बुडालें ॥**
**म्हणोनी कुडी वासना सांडि वेगीं ॥**
**बळें काळ हा लागला पाठिलागीं ॥**

जयजय रघुवीर समर्थ. (जातात.)

---

## प्रवेश दुसरा.

(रामघळींतल्या उत्तरेकडील एका मोठ्या दगडावर **रामदास** खाकेंत कुबडी घेऊन बसले आहेत.)

**रामदास**–पृथ्वीवरचे प्राणी किंवा आकाशांतले ढग यांच्यामध्यें एकसारखी दुसरी आकृति जशी कधींच दिसत नाहीं. त्याच प्रमाणें प्राणिमात्रांच्या आणि राज्यकारस्थानांत हरघडी उठणाऱ्या वावटळींच्या चित्रांची स्थिति आहे. अकालीं अवचित जमलेले ढग किंवा पांच सात तान्ह्या अर्भकांच्या सभेंत एकदम उत्पन्न झालेली रडारड–ह्यांचा शेवट जसा त्वरित एकच होतो, त्याचप्रमाणें मत्सरानं उठवलेलं काहूर आणि अदूरदर्शित्वानं केलेलं राजकारण यांची स्थिति आहे. जन्मकुंडलीच्या ग्रहांवरून तीन चार कारक योग उत्पन्न होत असले, तर ज्योतिषि ज्याप्रमाणें हलक्या ग्रहांना तुच्छ मानतात आणि छत्रपतित्वाचा योग स्थापित करतात, त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या कुंडलींत सध्यां तनुस्थानीं शिवाजीसारखा बलिष्ट ग्रह इतर स्वगृहींच्या चार ग्रहांच्या योग्य साह्यानं बसल्यामुळेंच स्वराज्याच्या

छत्रपतित्वाचा योग उत्पन्न होऊन, तो स्थापित होण्याच्या घटका आतां अगदीं भरत आल्या आहेत. आतां ह्या कुबडीच्या स्वरोदयाची इतिकर्तव्यता संपून—क्षणभर काळालाही गप्प बसायला लावणाऱ्या ह्या भगव्या पोषाखाचीही जरूरी आटपली असल्यामुळें, शिष्य—शाखेची योग्य व्यवस्था करून स्वधामाप्रत जाण्याच्या मार्गाचं पाऊल जरा जोरानं उचलायला लागलं पाहिजे! (पडद्यांत कल्याण म्हणतो)

**श्लोक.**

**जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला ॥**
**परी वादवीवाद तैसाचि ठेला ॥**
**उठे संशयोवाद हा दंभ भारी ॥**
**तुटे वादसंवाद तो हीतकारी ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ! (कल्याण येतो.)

**कल्याण**-शिवराज—दिल्लीहून राजगडीं येऊन सुखरूप पोचल्यावर सुरतेवर स्वारी घेऊन गेले आहेत. सदाशिव शास्त्री देव आपल्याकडे आले आहेत. (सदाशिवशास्त्री येतात.)

**रामदास**-(नमस्कार करून) या शास्त्री—महाराज!

**सदाशिव**-तुमची आणि आमची बरोबरी झाल्यास आम्हीं तुम्हाला नमस्कार करूं. नाहीं तर आशीर्वाद म्हणूं.

**रामदास**—आपण साक्षात भूदेव. आपण आशीर्वाद म्हणणंच योग्य आहे.

**सदाशिव**—परीक्षा झाल्यावांचून नमस्कार किंवा आशीर्वाद कां म्हणूं?

**रामदास**—परीक्षा ती काय?

**सदाशिव**—आमची वादभिक्षा आहे—ती द्यावी. तुम्हाला आम्ही जिंकल्यास जयपत्र घेऊं. आम्हांला तुम्ही जिंकल्यास

तुम्हाला जयपत्र देऊन ही दिवसां लावलेली मशाल स्वहस्तें विजवून ह्या यज्ञोपवीताला बांधलेल्या सुरीनं जीभ उतरून ठेवूं.

**रामदास**—वादभिक्षा म्हणणं आणि निग्रहपर बोलणं आम्हांला कशाला पाहिजे! आम्हीं केवळ रामाचे दास—अरण्यवासी. आम्हावर कृपा करावी. बरोबरीच्यांशीं आग्रह—पुरस्सर बोलावं. आमच्याशीं तसं बोलणं योग्य नाहीं.

**सदाशिव**— तुम्ही राजगुरु, सर्वांपेक्षां विद्वान, वामन पंडितांसारख्या विद्वानांनीं तुमचं शिष्यत्व पत्करून मराठी भाषेंत कविता करण्याची आज्ञा मानली, राजमंडळांतले तुम्ही अध्वर्यु, यास्तव जयपत्र घेणं तें तुमच्याच जवळून घेऊं आणि भाषण करणं तें तुमच्याशींच करूं.

**रामदास**—इतका आग्रह धरणं चांगलं नव्हे. पृथ्वीवर अनेक रत्नं असून, श्रीच्या भांडारांत कसलीच न्यूनता नाहीं; परंतु आमच्या छंदांत तुम्ही पडूं नये हें बरं.

**सदाशिव**—असल्या साधूपणाच्या गोष्टी ऐकायला आम्ही इथें आलों नाहीं. वाद करावा किंवा जयपत्र द्यावं.

**रामदास**—कल्याणा, शास्त्रीबोवा काय म्हणतात?

**कल्याण**—पात्र बहुत शुद्ध आहे; त्यांत त्यांनीं आपण होऊन गांठ घातली आहे. यास्तव कृपा करावी.

**रामदास**—तो मोळक्या कोण चालला आहे त्याला बोलावून आण. ( कल्याण जातो. )

**सदाशिव**—( स्वगत ) काय हें चमत्कारिक भाषण! स्वामींचं बोलणं पाह्यलं तर नम्रपणाचं दिसतं, पण आम्हीं आलों असतां आम्हांला उठून नमस्कार करीत नाहीं इतका उद्धट आहे. ( मोळक्यासह कल्याण येतो. )

**मोळक्या**—जोहार मायबाप. मीं महार आहें! मला काय आज्ञा आहे?

**रामदास**–तूं काय काम करतोस ?

**मोळक्या**–मठांत लाकडांची मोळी देऊन पोटाला भाकरी मिळवतों.

**रामदास**–( कुबडी देऊन ) कल्याणा, ह्या कुबडीनं जमीनीवर एक आडवी रेघ ओढून तिच्या आंत त्याला बोलाव !

**कल्याण**–( रेघ ओढून ) येरे ही रेघ वलांडून. ( रेघ ओलांडून तो आंत येतो. )

**रामदास**–तूं कोण आहेस ?

**मोळक्या**–शूद्र आहें.

**रामदास**–दुसरी रेघ ओढून त्याला आंत घे.

**कल्याण**–( दुसरी रेघ ओढून ) येरे हिच्या आंत.

**रामदास**–( मोळक्या दुसऱ्या रेघेच्या आंत आल्यावर) आतां तूं कोण आहेस ?

**मोळक्या**–वैश्य आहें.

**रामदास**–तिसरी रेघ ओढून त्याला आंत घे.

**कल्याण**–( तिसरी रेघ ओढून ) ये हिच्या आंत.

**रामदास**–( तो आल्यावर ) आतां तूं कोण आहेस ?

**मोळक्या**–क्षत्रिय आहें.

**रामदास**–आणखी एक रेघ ओढून त्याला आंत घे.

**कल्याण**–( चवथी रेघ ओढून ) ही रेघ वलांडून आंत ये.

**रामदास**–( आंत आल्यावर ) आतां तूं कोण आहेस ?

**मोळक्या**– ब्राह्मण आहें.

**रामदास**–कांहीं पढलेला आहेस का ?

**मोळक्या**–सर्व पढलों आहें ! कोणाशीं वाद करूं ?

**रामदास**–ह्या पंडितांशीं.

**मोळक्या**–काय हो, हें जग परमेश्वरानं स्वतःच्या स्तुतिवादाकरतांच उत्पन्न केलं आहेना ?

**सदाशिव**-ह्यांत काय संशय !

**मोळक्या**-असल्या आज्ञानाच्या गर्वराशीकडे आपण कोणच्या शक्तीनं परमेश्वराचा संबंध जोडणार ?

**सदाशिव**-नैसर्गीक शक्तिच आमच्या कडून असं वदवते कीं, परमेश्वराच्या कांहीं एका विशिष्ठ चैनीकरतां ह्या जगाची उत्पत्ति झाली आहे.

**मोळक्या**-अहो, अध्रुवांकरतां चैन असून शाश्वताला तिची जरूरी नाहीं असं वेदांति म्हणतात. तेव्हां असल्या ह्या खेळाच्या वस्तूची परमेश्वराला काय जरूर ?

**सदाशिव**-जरूर म्हटली तर मानवी प्राण्याचं प्रेम हीच होय !

**मोळक्या**-जी वस्तु उत्पन्नच झालेली नाहीं तिच्याबद्दल आधीं प्रेम कसं उत्पन्न होणार ? शिवाय, ज्या स्थलीं शाश्वत असं दुःख आणि अतर्क्य अशा हालअपेष्टांचं साम्राज्य अबाधित चालू आहे, अशा ठिकाणच्या चमत्कारिक रमणीयतेचा अनुभव घेण्याकरतांच कोट्यावधि मानवी-प्राणी उत्पन्न करण्यांत येतात ह्या म्हणण्याला प्रीति हें नांव द्यायला कोण तयार होईल ?

**रामदास**-आतां सदाशिवशास्त्र्यांनीं पूर्वपक्ष करावा.

**सदाशिव**-हें जग निर्माण कां झालं आहे ?

**मोळक्या**-संसार म्हणून जें वेदांत्यांचं एक मुख्य आणि अमोल तत्व आहे तें अबाधित राहण्यासाठींच ह्या जगाची रोजची नवी उत्पत्ति थांबत नाहीं, आणि तीच तात्विक आवश्यकता ह्या जगाच्या उत्पत्तीचं कारण आहे !

**सदाशिव**-हें जग कोणच्या मार्गानं चाललं आहे ?

**मोळक्या**-भौतिक आणि आधिभौतिक ह्या दोन मार्गांनीं.

**सदाशिव**–ह्या दोहोंत श्रेष्ठ मार्ग कोणचा ?

**मोळक्या**–आधिभौतिक.

**सदाशिव**–तो कसा ?

**मोळक्या**–त्यांत दोन्ही मार्गांचा अनुभव घेतां येतो म्हणून.

**सदाशिव**–जो मार्ग–हेवा, द्वेष वगैरेनीं तुडुंब भरलेला असून यांत रक्तपातासारखीं अघोर कर्मे घडतात, त्यांत भौतिक–त्व कसं सांपडणार ?

**मोळक्या**–भौतिकमार्गाची वाट सुलभ करणाऱ्या वस्तु ाधिभौतिकाशिवाय मिळणं दुरापास्त आहेत. आणि त्या नसतील र भौतिकांत मन शिरण्याला देहाचं स्थीरत्व आवश्य आहे.

**सदाशिव**–आजपर्यंत भौतिकमार्ग कसा चालला ?

**मोळक्या**–अनेक संसारी लोकांच्या साह्यानं.

**सदाशिव**–तो कसा ?

**मोळक्या**–सुखानं संसार करण्यास स्वराज्य हवं. स्वराज्यच र भौतिकांत निमग्न होईल, तर कोणी कोणाला पुसणार नाहीं, ाणि त्यायोगें लोकांचं फावून स्वराज्याबरोबर दोन्ही मार्गांतून ्पार व्हावं लागेल.

**सदाशिव**–सर्वच जर संसारी झाले, तर विरक्त कोणी व्हावं ?

**मोळक्या**–श्रीसमर्थ रामदासांप्रमाणें कोट्यावधींत एकाद्यानं.

**सदाशिव**–ह्याचं कारण काय ?

**मोळक्या**–राष्ट्र रक्षण करण्यास जसे लाखों सैनिक लागतात ाचप्रमाणें लाखों संसाऱ्यांनां संसारांत राहून परमार्थाची वाट खवणारी एकच विभूति पुरे होते म्हणून.

**सदाशिव**–प्राण्याची प्रवृत्ति काय आहे ?

**मोळक्या**–सुखोपभोगी !

**सदाशिव**–खरं सुख कुठें आहे ?

**मोळक्या**-ब्रह्मानंदांत.

**सदाशिव**-मग तें संसारांत मिळेल काय ?

**मोळक्या**-मिळालंच पाहिजे.

**सदाशिव**-तें कसं ?

**मोळक्या**-स्त्रीरूप शक्तिसेवनांत.

**सदाशिव**-परंतु तें शाश्वत नाहीं.

**मोळक्या**-सर्वच जर स्वप्न तर राह्यलं काय ? करता करवता जो कोणी तो मात्र खरा.

**सदाशिव**-तो कसा आहे ?

**मोळक्या**-तो सर्वांत असून सर्व त्यांत जरी आहेत, तरी तो सर्वांहून भिन्न आहे.

**सदाशिव**-त्याचं स्वरूप काय ?

**मोळक्या**-विश्व.

**सदाशिव**-पृथ्वी कुठें आहे ?

**मोळक्या**-विश्वांत.

**सदाशिव**-विश्व कुठें आहे ?

**मोळक्या**-आकाशांत.

**सदाशिव**-आकाश कुठें आहे ?

**मोळक्या**-आभासांत.

**सदाशिव**-( रामदासांच्या पायां पडून ) जन्मजन्मांतरीच्या पुण्याईनं ब्राह्मण झालों. वाराणशी क्षेत्रीं चोवीस वर्षं अध्ययन केलं. गर्वानं दिवसा मशाल पेटवून जानव्याला सुरी बांधली. अनेक जयपत्रं मिळवलीं. राजा शिवाजीची सभा जिंकण्याच्या उद्देशानं आलों. समर्थांशी गर्वोक्ति केल्या. ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद म्हणवला. समर्थांनीं अंत्यजाकडून माझा गर्वपरिहार केला. आतां ही मशाल कशाला हवी ? ( विजवतो ) प्रतिज्ञेप्रमाणें जीभ कापावी हेंच खरं. ( कल्याण त्याचा हात धरतो. )

**रामदास**–पंडित महाराज, दुराग्रहाचं कारण काय ? कुणी कुणाचं जयपत्र घ्यावं ? जीभ कुणी कुणाची कापावी ? दिवसा मशाल कुणी कुणाची विजवावी ? तुम्हीं समर्थ असून, श्रीरघुपतीच्या भांडारांत अनेक विभूति आहेत. यास्तव दुराग्रहाची गोष्ट कधींही करूं नये. ( मोळक्याला ) अरे, तूं जशा रेषा ओलांडून आलास तसाच ओलांडून माघारा जा.

**मोळक्या**–आज्ञेप्रमाणें करतों, पण माझी एक विनंति ऐकावी.

**रामदास**–बोल.

**मोळक्या**–पूर्वी मी चित्रसेन नांवाचा गंधर्व होतों. ऐकेवेळीं मद्यप्राशनानं मदांध होऊन स्त्रियांसह क्रीडा करीत असतां नारद मुनींची माझ्या हातून अवहेलना झाली. त्यामुळें त्यांनीं मला 'अरे मदांधा, तुला मृत्युलोकीं, पशुयोनींत दोन आणि अंत्यजांत एक असे तीन जन्म होतील' असा शाप दिला. त्याबरोबर मी शुद्धीवर आलों आणि शरण गेलों. तेव्हां त्यांनीं कृपार्द्र होऊन, 'तुला शाप देण्याचं कारण नाहीं; परंतु ऐश्वर्य मदामुळें तुला साधूंचा महिमा ठाऊक नाहीं. पुढें कलियुगांत साधूंचे अवतार होणार आहेत. त्यांचं महात्म्य काय असतं तें तुला कळण्याकरतां प्रथम शाप देऊन त्या साधूंच्या कृपेनं तुझा उद्धार होईल असा उश्शाप देतों.' असं ते म्हणाले. तेव्हां मी विनंती केली कीं, कोणच्या साधूंच्या योगानं उद्धार होईल आणि माझे जन्म कसकसे होतील ? तेव्हां ते म्हणाले 'प्रथम जयपाळ राजाच्या घरीं तूं घोडा होशील. तिथें श्रीसांबअवतार मुकुंदराज येऊन तुझा उद्धार करतील. नंतर प्रतिष्ठानक्षेत्रीं ब्राह्मणाच्या घरीं तूं रेडा होऊन श्रीविष्णुअवतार ज्ञानेश्वर तिथें तुझा उद्धार करतील. आणि नंतर तूं चाफळास अंत्यज होऊन, श्रीमारुतीअवतार

समर्थ रामदास तुझा उद्धार करून तूं स्वस्थलीं येशील.' तेव्हां श्रीनारदस्वामींच्या वचनाप्रमाणें स्वामींनीं अनुग्रह करून मुक्त केलं आहे. आतां हा देह इथेंच टाकून वरून येणाऱ्या त्या विमानांत बसून स्वस्थानीं जाण्याची आज्ञा व्हावी.

**रामदास**–नारदस्वामींची इच्छा पूर्ण झालीच पाहिजे.

**मोळक्या**–आतां एक शेवटची विनंति आहे.

**रामदास**–बोल.

**मोळक्या**–पूर्वींच्या दोन देहांचा उद्धार झाला तिथें साधूंनीं दोहोंचे चमत्कार करून ठेवले आहेत. त्याच प्रमाणें ह्या देहापासून स्वामींनी मुक्त केलं. तेव्हां ह्या देहाचाही चमत्कार जगाला कळून माझं अल्प चरित्र प्रसिद्ध व्हावं म्हणून रथोत्सव समयीं रथावर श्रींची स्वारी दीपमाळेपर्यंत येते; त्या काळीं माझा जो कोणी वंशज असेल त्याला मानाचा नारळ देऊन, श्रींची स्वारी माघारी फिरावी असा वर द्यावा.

**रामदास**–ठीक आहे. तुझी इच्छा पूर्ण होईल.

( मोळक्या अंत्यजाचा देह टाकून दिव्य देह धारण करतो आणि घंटानादांत व विद्युल्लतेसारख्या दिव्य प्रकाशांत आलेल्या विमानांत बसून स्वर्गी जातो. )

**सदाशिव**–मीं पतित आहें. मला आज स्वर्गीचा चमत्कार दाखवून स्वामींनीं पावन केलं.

**यस्मिन् कस्मिंश्च वर्णेतु ज्ञानं देहं प्रतिष्ठितं ॥**
**तस्य दासस्य दासोहं भवेजन्मनिजन्मनि ॥**

असं भगवद्वाक्य आहे तिथें माझ्या सारख्या कःपदार्थाचा काय पाड ! मला अनुग्रह देऊन माझा उद्धार करावा.

**रामदास**–तुम्ही जन्मजन्मांतरीचे श्रींचेच दास आहांत. आतां तुमची ह्या जगांतली इतिकर्तव्यता संपली असल्यामुळें तुम्हीं इतउत्तर सदाशिव हें नांव सोडून देऊन वासुदेव पंडित

असं नांव धारण करून मौजे कण्हेरी प्रांत शिरोळें येथें मठ करून रहावं आणि आमच्या इतर शिष्यांप्रमाणें श्रींचा संप्रदाय वाढवावा.

**कल्याण**– **श्लोक.**

**म्हणे दास सायास त्याचे करावे ॥**
**जगीं जाणता पाय त्याचे धरावे ॥**
**गुरू–अंजनेवीण तें आकळेना ॥**
**जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥ १ ॥**

जयजय रघुवीर समर्थ! (शिष्यासह साष्टांग नमस्कार घालून सदाशिवभट्ट जातो.)

**रामदास**–कल्याणा, आम्हीं बसलों आहोंत ह्या धोंड्याचं नांव आजपासून बहिरधोंडा असं ठेवतों. कारण बहिरु महाराचा हा मृत देह, ह्याच्या खालीं पुरायचा आहे. असो. वेणूला मिरजेस, उद्धवाला इंदुरास, भिकाजीला राजा व्यंकोजीपाशीं वगैरे बऱ्याच शिष्यवर्गाला मठ स्थापून देऊन त्यांची व्यवस्था केली. आतां राहिलांत तुम्हीच. तेव्हां तुमचीही आतां व्यवस्था करायची आहे. अक्काची व्यवस्था परळीच्या मठांत केलेलीच आहे.

**कल्याण**–आज स्वामींनीं हें काय मनांत आणलं आहे? मला दूर करणं योग्य नाहीं.

**रामदास**–आजपर्यंत आमच्याजवळ राहून हेंच का ज्ञान प्राप्त झालं?

**कल्याण**–तसं नव्हे. परंतु सेवेंत अंतर पडूं नये ही इच्छा आहे.

**रामदास**–अरे, प्रत्येक प्राण्याची उत्पत्ति कांहीं तरी एका विशिष्ट कारणामुळें होत असते. तें त्याच्या हातून पार पडलं म्हणजे त्याची ह्या जगांतली इतिकर्तव्यता संपते आणि

तो आपला पसारा व्यवस्थित करून, कर्माप्रमाणें पुढच्या मार्गाला लागतो. त्याचप्रमाणें आमचीही स्थिति आहे. ह्या जगाला सांगण्याकरतां परमेश्वरानं जो आम्हांला निरोप सांगितला होता आणि जें कर्म करण्याची आज्ञा केली होती, त्या दोहोंतून आम्हीं पार पडलों असून—त्याचं चित्र येत्या १५९६ च्या ज्येष्ठ शु० त्रयोदशीला दिसणार आहे. तें दृष्टीस पडलं म्हणजे आम्हीं आमचा स्वधामाचा मार्ग जोरानं चालूं लागणार. आतां, जगापासून अलिप्त राहून दुसऱ्याच एका विशिष्ट गोष्टीची आम्हाला व्यवस्था करायची आहे.

**कल्याण**—महाराज, मायेचा तडाका अजब असल्यामुळें तिच्यापासून दूर होतां येत नाहीं आणि म्हणूनच विरहाचे कष्ट होतात.

**रामदास**—कल्याणस्वामी, माया मिथ्या म्हणजे अबद्ध ब्रह्म तीच माया आणि माया तेंच ब्रह्म.

**कल्याण**—ह्या दोहोंस पृथकत्व नाहीं असं जर मानलं, तर वेदांतादि शास्त्रांस बाध येतो. वसिष्ठ, वामदेव, व्यासादिकांच्या कृत्याला बाध येतो आणि मन्वादिकांच्या शब्दांनां असत्यता येते. हें कसं काय ?

**रामदास**—तसं नव्हे ! वेदांतादि शास्त्रं खरीं असून, ते थोर लोक—त्याग—शब्द बोलून पूर्ण पदाला पावले हेंही खरं. इतकंही असून ब्रह्म तींच माया आणि माया तेंच ब्रह्म हेंही खरंच आहे!

**कल्याण**—तें कसं ?

**रामदास**—ब्रह्म म्हणून जसा पदार्थ नाहीं तसंच मायेचं असून, तीही सर्वव्यापी ब्रह्माप्रमाणेंच आहे. अग्नींत दाहकत्व आणि प्रकाशकत्व हे जरी दोन गुण आहेत, तरी दाहकत्वास आणि अग्नीस पृथकत्व नाहीं. अग्नीचा धर्म प्रकाशकत्वाचा असून, उपाधींच्या योगानं त्याच्या अंगीं दाहकत्व जरी आहे,

तरी पृथकत्व नाहीं. दाहकत्व आणि पृथकत्व हे गुण पृथक पाहणें असेल, तर प्रफुल्लित अग्नींत, मोहोऱ्याच्या खड्याला कच्चं सूत गुंडाळून तो अग्नींत टाकला असतां, सुताला अग्नीचा स्पर्श होत नाहीं. कारण मोहोऱ्याच्या योगानं दाहकत्वाचं पृथकत्व झालं!

**कल्याण**—मी मूढ आहें. मला तें काय कळणार?

**रामदास**—ह्याचा अर्थ असा कीं, लौकिक—मायेनं व्याप्त असून, तुझं आणि आमचं पृथकत्व आजपासून लौकिकदृष्ट्या होणार आहे. कारण झाडाखालीं झाड वाढत नाहीं.

**कल्याण**—ह्यावरून समर्थांना माझा कंटाळा आला आहे असं दिसतं! महाराज, माझा अव्हेर करून, मला दूर करूं नये.

**रामदास**—आत्मा आत्म्याच्या ठायीं लीन होतो, म्हणूनच पापाचरणी लोकांनां पुण्याचरणी लोकांच्या संगतीचा फायदा होतो. प्रत्यक्षप्रमाण संभाजी युवराजांचं घ्या! ते जात्या जरी बापापेक्षां शूर आहेत, तरी पुढें दुःसंगतीनं पापाचरणी निघून सर्वस्वाची होळी करून घेणार आहेत अशी त्यांची एव्हांपासूनचींच कृत्यं दिसूं लागल्यामुळें, शिवबा कोठेंही जावोत, त्यांस ते आपल्यापासून कधीं दूर करीत नाहींत; परंतु तुमची गोष्ट तशी नाहीं. तुम्ही पुरे कसोटीला उतरले आहांत!

**कल्याण**—आणि म्हणूनच स्वामीचरणांची सदोदीत सेवा करीत संनिध राहण्यापलीकडे दुसरा कांहीं हेतु नाहीं.

**रामदास**—श्रीरघुपतींच्या इच्छेआड कोणी व्हावं? तुमच्या हातून त्यांची सेवा फार घडल्यामुळें इतउत्तर तुमच्या हातून उपासना वाढवून जगदुद्धार करावा अशी श्रीची इच्छा आहे, आणि तिला तुम्हीं मान देणं अवश्य असल्यामुळें, तुम्हांला आमच्यापासून दूर झालंच पाहिजे.

**कल्याण**–दूर म्हणजे कुठें ?

**रामदास**–शिवराजांनीं शिष्यवर्गाकरतां ज्या सनदा करून दिल्या आहेत, त्यांपैकीं डोमगांवची सनद तुमच्याकरतां वाट पहात आहे. तिचा तुम्ही स्वीकार करून, त्या गांवीं मठस्थापना करावी ; कारण तें स्थान तुमच्याच करतां नेमलेलं आहे! ( सनद देतात. )

**कल्याण**–( सनद घेऊन ) याचा अर्थ कळत नाहीं !

**रामदास**–ह्याचा अर्थ असा आहे कीं, पूर्वीं आपण कांहीं मंडळीसह सीनेच्या तीरावरून पर्यटण करीत असतां, डोमगांवच्या एका जाळीला आमच्या मेखळेचा पदर आडकला होता. हें तुम्हांला कदाचित स्मरत असेल. तो पदर तुम्हीं स्वहस्तें सोडवलात. तेव्हां त्याचा भाव असा कीं, त्या जागीं आम्हीं असावं ही त्या भूमीची इच्छा खरी, परंतु परमेश्वरी संकेताप्रमाणें तुम्हीं, आम्हाला आमचा पदर सोडवून तिथून दूर केलंत. म्हणून तीच जागा तुम्हीं आपल्याकरतां निवडून ठेवली आहे आणि परमेश्वरानं नेमली आहे. तेव्हां परमेश्वराचे अशा रीतीनं व्यक्त होणारे गुप्त हेतु पार पडलेच पाहिजेत. तिथें उपाय नाहीं. म्हणून आतां अज्ञानांत न शिरतां, परळीस गेल्याबरोबर निघण्याची तयारी करा. शिष्यवर्गांत जीं लहान लहान सहा मुलं आहेत तीं बरोबर घ्या. प्रस्थान ठेवल्याला आज बरेच दिवस झाले आहेत; तेव्हां मुहूर्ताची जरूर नाहीं.

**कल्याण**–समर्थांच्या संकल्पाबाहेर कोण जाणार ; परंतु देहांतापर्यंत सेवा घडावी ही इच्छा आहे.

**रामदास**–बापा, तूं आहेस तावत्काल पर्यंत तुझ्याच हातून सेवा घडेल. काळजी करूं नको. आम्हीं आतां राजगडाकडे जातों.

कल्याण— श्लोक.

जनीं सर्व–सूखी असा कोण आहे ॥
विचारी मना तूंचि शोधोनि पाहे ॥
मना त्वांचिरे पूर्व–संचीत केलें ॥
तया सारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ १ ॥

रामदास— श्लोक.

मना मानसीं दुःख आणूं नकोरे ॥
मना सर्वथा शोक–चिंता नकोरे ॥
विवेके देहे–बुद्धि सोडून द्यावी ॥
विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥

( कल्याण पायां पडतो. )

दोघे—जयजय रघुवीर समर्थ ! ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश तिसरा.

( रानांतील रस्त्यावर रामदास येतात. )

**रामदास**—सूर्याच्या अंगीं प्रखरता ठेवण्यांत परमेश्वराचा जसा अत्युच्च हेतु आहे तसाच प्राणीमात्रांच्या उत्पत्तींतही आहे. तो ज्याचा त्यानं ओळखून सफल केला कीं, ईश्वरानं तयार केलेल्या पात्राचं ह्या रंगभूमीवरचं काम संपलं. एखादा गवई बेसूर गाऊं लागला असतां, श्रोत्यांचा उद्देश जसा भेसूर होतो, तद्वतच प्रत्येक पात्राचं आहे. ह्या भगव्या वेषाचा आणि ह्या कुबडीचा अर्थ, जर ह्या पात्राला कळला नसता, तर फक्त संतती उत्पन्न करून वंशवृद्धी करण्याच्या कामांतच इतर जनांप्रमाणें ' सावधान ' शब्द ऐकूनही, परक्याच्या मुलीशीं मैत्री केली असती आणि पारतंत्र्यांत निमग्न झालेल्या लाखों महाराष्ट्रीयांप्रमाणें ह्या देहाकडून नवे गुलाम उत्पन्न झाले असते; परंतु नाहीं—आपल्या जन्माचा अर्थ आपल्याला कळल्यावर असं कोण करणार ! स्वधर्माच्या स्नेहांतली स्वातंत्र्याची वात, ह्या हृदयांत

पेटल्यामुळें–वयाच्या बाराव्या वर्षींच संसाराची बिडी खाडकन् तोडली आणि बारा वर्षे पर्यंत तपश्चर्या करून शुद्ध केलेल्या ह्या जमीनीला–बारा वर्षांच्या देशपर्यटणाच्या स्वधर्मजागृतीनं भाजून काढली आणि पांच वर्षेपर्यंत, धार्मिक आणि राजकीय अशा दु-फाळया नांगरांनीं ही आर्यभू नांगरून–शिवाजी सारख्या लोकनायकाच्या पराक्रमाचं बीं त्यांत पेरलं. नंतर चोवीस वर्षेपर्यंत यवनी किड्यांच्या अंगांतलं रक्त त्या राजकीय बियाण्याला पाजल्यामुळें आतां तें शेत लोंगरलं आहे. त्या राजकीय शेतांतल्या कणसांचीं तोरणं–महाराष्ट्रीयांच्या दरवाज्यावर बांधण्याचा सुयोग आज त्रेपन वर्षांच्या मेहनतीनं आला आहे. असं हें राजकीय बियाणं फळाला येणं, अकुद्ध वृक्षाप्रमाणं मोठं खडतर परंतु अंतीं फार मधुर आहे. तेव्हां इतक्या मेहनतीचं योग्य फल जो आम्हां महाराष्ट्रीयांच्या शिवराजाचा राजगडावरचा राज्याभिषेक, त्याचं माधुर्य चाखण्याचा आज आम्हांला कित्येक शतकांनीं प्रसंग आला असल्यामुळें–महाराष्ट्रीयानों, हा रामदास तुम्हांला आमंत्रण करण्याकरतां आला आहे–तर चला–राजगडावर जाऊं आणि स्वकृतीनं क्षत्रिय ठरलेल्या शिवराजाच्या प्रेमळ राज्याभिषेक पाहून आनंदगजर करूं. हाच आनंदगजर करण्याचा योग नुसत्या वाचाळतेनं कधीं येत नाहीं.

**श्लोक.**

क्रियेवीण नानापरी बोलिजेतें ॥
परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे ॥
तया मानवा देव कैसानि पावे ॥ १ ॥

म्हणून— **ओव्या.**

इशारतीचें बोलतां नये ॥ बोलायाचें लिहूं नये ॥
लिहावयाचें सांगूं नये ॥ ाबीनें ॥ १ ॥

कारण— श्लोक.

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ॥
दिसंदीस अभ्यंतरीं गर्व साचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ॥
विचारीं मना तूंचि शोधूनि पाहे ॥ १ ॥

हें जर खरं आहे आणि प्रत्येकाला जर स्वातंत्र्यांतलं सुख पाहिजे आहे, तर त्यानं स्वजन्माचा उद्देश ओळखून मीपणा सोडून उद्दिष्ट कार्य केलं असतां शांततेच्या आरामांत ह्या देहा प्रमाणें ब्रह्मानंदाचं सुख प्राप्त करून घेतां येतं. (जातात.)

---

## प्रवेश चवथा.

स्थळ—राजगडावरील राज्याभिषेकाचा महाल.

पात्रें—अष्टप्रधान, भूषणकवि, गंगाभट्ट, भालदार, स्तुतिपाठक, नागरिक वगैरे.

भूषणकवि— सवैया.

जापर साहितनै शिवराज सुरेसकी ऐसी सभा सुभ साजै ॥
यौं कवि भूषण जपत है लखि संपतिको अलकापति लाजै ॥
तामधि तीनहूँ लोककि दीपति ऐसो बडो गढराज विराजै ॥
वारि पताल सीमाची मही अमरावतिकी छबि ऊपर छाजै ॥

(शिवाजी, सईबाई आणि संभाजी येतात त्यांस पाहून)

दोहा.

दशरथके जो राम भो वसुद्योके गोपाल ॥
सोई प्रगट्यो साहिके श्रीसिवराज भुवाल ॥ १ ॥
उदित होय सिवराजके मुदित भए द्विजदेव ॥
कलजुग हट्यो मिट्यो सकल म्लेंच्छ निको अहमेव ॥२॥

शिवाजी—सभाजनहो, आजचा हा अशा तऱ्हेचा समारंभ, ह्या पुण्यभूमींत, कित्येक शतकांनीं साजरा करण्याचं तुम्हीं मनांत आणलं आहे—हें पाहून आर्यलक्ष्मीला जसा आनंदोत्कर्षाचा गहिंवर येणं साहजिक आहे, त्याच प्रमाणें आर्यशत्रूंना

दुःखाचा गहिंवर येऊन त्यांनीं नाइलाजानं आपली संमती दर्श-वणंही अगदीं बरोबर आहे. ज्या सिंहासनावर आज तुम्हीं मला पट्टाभिषेक करण्याचं योजलं आहे, त्यावर, शांततेंत बसण्याचे दिवस जरी अद्याप आपल्याला आले नाहींत, तरी ज्या प्रमाणें समुद्रांत चौऱ्यायशीं बंदरं आणि नर्मदेपासून रामेश्वरा-पर्यंतचा भूभाग यांचं स्वामित्व आज पूर्णपणें मराठ्यांचं झालं आहे त्याच प्रमाणें आपणां सर्वांच्या अश्रांतश्रमानं उत्तर हिंदुस्तानही पादाक्रांत करून सर्वत्र मराठी भाषेचं मराठ्यांचं साम्राज्य लवकरच प्रस्थापित होणार आहे.

**गंगाभट्ट**–( पुढें येऊन ) राजा, तुझा विजय असो! आम्हाला समर्थांनीं वाराणशी क्षेत्राहून तुझ्या राज्याभिषेकाला मुद्दाम इथें आणलं आहे. तुझी पूर्वीची कुलकथा जरी बाजूला ठेवली, तरी आज तूं आपल्या कर्मानं क्षत्रियाच्या पदाला प्राप्त झाला आहेस. दक्षिणेतल्या ब्राह्मणांचा झालेला गैरसमज दूर करून आज आम्हीं त्यांनां इथें तुला राज्याभिषेक करण्याक-रतां तुझे पौरजन म्हणून आणले आहेत. तेव्हां आतां आम्हीं सांगूं त्याप्रमाणें शपथ घेऊन तुला राज्याभिषेक करून घेतला पाहिजे.

**शिवाजी**–आज आमच्या जन्मभूमीला जें स्वातंत्र्य प्राप्त झालं आहे तें आपणां सर्वांच्या इच्छेप्रमाणें मीं वागलों नसतों तर कधींच झालं नसतं.

**गंगाभट्ट**–क्षात्रतेज प्रकट करणारी ही न्यग्रोधाची शाखा, सौख्य देणारी ही उदुंबराची शाखा, सार्वभौमत्व देणारी ही अश्वत्थ-शाखा आणि सर्व पृथ्वीवरील राजांना मांडलीक करून त्यांवर निर्बंध असं राज्य करण्याची शक्ति देणारी ही प्लक्ष वृक्षाची शाखा अशा ह्या चार शाखा–राजा, तूं आपल्या उजव्या हातीं घे.

( घेतो. ) आतां औदुंबराच्या लांकडाच्या तयार केलेल्या पायऱ्यांवरून सिंहासनावर चढण्यापूर्वीं हा सुवर्णाचा सोमकलश हातांत घेऊन तुला आम्हीं सांगूं त्याप्रमाणें शपथ घेतली पाहिजे.

**शिवाजी**–आपली आज्ञा शिरसावंद्य आहे.

( सुवर्ण सोमकलश हातांत देऊन पुढील शपथ शिवाजीकडून म्हणून घेतात )

**शपथ.**

**अनेन सोमराजेन शपे–पुरोधसि त्वयि निरपराधिनं मा सदा लक्षय यदिविरुद्धं वर्तिष्ये ममा द्यप्रभृति रा पर्यंतं यानिविविधानि सत्कृत्यानि मत्कृतानि भवये स्तानि सर्वाणि निर्फलानि भवंत्वि ति ।**

( सईसह सिंहासनावर बसल्यावर ) शिष्या, क्षात्रतेज दर्शवणाऱ्या लहान तांदुळांच्या लोंब्या, सार्वभौमत्व दर्शवणाऱ्या जाड्या तांदुळांच्या लोंब्या, सर्वसौख्य दर्शवणारी प्रियंगु वनस्पति आणि सैनिकांच्या नायकत्वाचं चातुर्य प्रगट करणारे सातूचे तुरे आण.

( शिष्या आणून देतो. )

राजा, हें दही तुझ्या मस्तकाला जगांत तीव्र करो. हा मध वनस्पतींतलं वीर्य असल्यामुळें तूं वीर्यवान होवोस. गोमातेचा कस यांत पूर्णपणें असल्यामुळें हें शुद्ध नवनीत तुझं वैभव वाढवो आणि सूर्यप्रकाशांत पडलेल्या पावसाचं हें पाणी तुला अमर करो.

**शिवाजी**–तथास्तु.

**गंगाभट्ट**–राजा, आतां आम्हीं सर्व ब्राह्मण तुला ह्या महाराष्ट्राच्या सिंहासनावर–आतां सांगितल्या इतक्या द्रव्यांनी पट्टाभिषेक करीत आहोंत तर शांत चित्तानं बैस.

( चार धान्यांच्या लोंब्यांनीं चार वस्तूंच्या मिश्रणाचा अभिषेक सुरू करतात. )

**अभिषेकमंत्र.**

**हिरण्यवर्णा शुचयः पावका राष्ट्रवर्धन्य आपः पुनन्तु । त्वाञ्जयन्ददतु । सन्ततिं वर्धयन्तु । तासां राजा वरुणो बहुमू-**

ल्यानि रत्नानि ददतु । यम आयुर्वर्धयतु । शत्रून्नाशयतु । इन्द्रो मरुता ङ्गण स्ते कामान् पुष्यतु । मित्रो सर्वदिक्षु यशः प्रथयतु । चतुःसमुद्रेभ्यो गंगादिपावनीनदीभ्यो आनीताभि रद्भि रभिषिक्ते त्वै चित्तस्थैर्य म्मन्त्र शुद्धि मिंद्रियतुष्टि रिंद्रिय सँयमनं । परमं क्षात्रतेजो नाथरक्षणं निरपराधि-सद्रक्षण न्नयचक्षु श्चारचक्षु र्निर्मत्सरत्व न्दयाशीलत्व मति-थिपूजन मभ्यसूयाराहित्यं षड्रिपुक्षयो भवतु । परिखीकृत-सागरां समुद्रवेलावप्रकृता म्महीं शासनक्षांम्यादिगुणाः स्त्वयिसचंतु । एतद्भि र्गुणै र्युक्तो भवान् राजाधिराजो भवतु । ॐ शांतिः शांतिः शांतिः ।

**शिवाजी**—हें मस्तक अशा तऱ्हेनं अभिषिक्त करून, ह्या प्रजाजनांचा योग्य मार्गानं प्रतिपाल करण्यास लायक करणाऱ्या पंडितंमन्य महामहोपाध्याय गंगाभट्टजी यांस क्षत्रियाच्या अम-र्यादित क्षात्रतेजाप्रमाणेंच योग्य दक्षिणा न दिल्यास ह्या यज्ञाची सांगता होणार नाहीं. म्हणून ज्या ह्या देहाकडून क्षात्रतेज प्रगट होत आहे त्याची सोन्याची एक तुला, सहस्र गाई आणि वेदवचनाप्रमाणें चतुष्कोन भूमी अध्वर्यूंना दान देऊन बाकीच्या ब्राह्मणवर्गास अन्नदानांसह दुसरी आमची सुवर्णतुला दान देण्याचा आमचा विचार आहे.

**गंगाभट्ट**—राजा, आतां तुला तुझ्या हातांतल्या सुवर्णपात्रांतलं सोमपान करायचं आहे. तें पेय प्रथम देवांना अर्पण करून तूं पी.

### सोमपानमंत्र.

इमं सुवर्णकसं स्वादिष्टया मदिष्टया सोमधारया पूर्णं गृह्णतु भवान् । अयं त्वयि बल मोजो निधत्तां । पृथिव्यां स्वातं-त्र्यभाजं करोतु । वीर्यं वर्धयतु । पारतंत्र्याद्दूरं रक्षतु ।

( शिवाजी सोमरस पितो. )

युवराज संभाजी, तुझ्या वडलांप्रमाणेंच तुलाहि राज्याभिषे-

कांत सुस्नात होण्याची संधी परमेश्वरानं परमकृपेनं आज आणून दिली आहे. तर पुढें ह्याचप्रमाणं आपल्या वडलांच्या हातूंन ह्याच सिंहासनावर महाराजाधिराजाचा अभिषेक करून घेऊन, वार्धक्यांत मुनिवृत्तीनं योगसाधन करण्याची संधी शिवराजाला आणून दे आणि धन्य हो.

**संभाजी**–तथास्तु.

**रघुनाथाध्वरी पंडित**–( चूर्णिका म्हणतात. )

**गद्य.**

जयजयकार महाराज। दक्षस्तु दिशापाल शिवनृपाल निर्निद्रानिदर्शक निरातंग वैरिनिच्छेदक । यद्रथगतीनाकपर्यंत राज्याश्रममुनि इष्टलक्ष्य भिदुन्मत्त यवनमातंग–मदभंगक आफलोदय कर्मवान। टक्कर टंकारसम यद्धनुटङ्कर तक्षकासम गुप्ततमेंद्रिय अथर्वनिधि महाराष्ट्रसाम्राज्य–प्रस्थापक गीर्वाणभाषांतर्गत महाराष्ट्रभाषोन्नतिकारक। गर्वबलोन्मत्त यवन–रिपुवर्ग जयें नमविला तो विजयि असो॥

( स्त्रियांचा नाच व गाणें होतें. )

**भूषण**– **कबित.**

इंद्र जिमि जंभपर वाढव ज्यों अंभपर रावन सदंभपर रघुकुल राजहैं
पौन वारिवाहपर संभु रतिनाहपर ज्यौं सहस्रबाहपर राम द्विजराजहैं
दावा द्रुमदंडपर चीता मृगझुंडपर भूषन वितुंडपर जैसे मृगराज हैं
तेज तम अंसपर कान्ह जिमि कंसपर त्यौं म्लेंच्छ वंसपर सेर सिवराजहै

सांचकर माने देवी देवता न जाने अरु, ऐसी उर आनेमें, कहो बात तबकी ॥ और पादशाहनकें, चाहहती हिंदुनकी, सहां जांहां अकबर, सुनत साख जबकी ॥ बब्बरके तिब्बर, हीमायु हद्द बांधी गये, दोनो एक करीना, कुरान बेद मतकी ॥ कासीकी कला जाती, मथुरा मसीद होती, सिवाजी न होता तो, सुन्त होत सबकी ॥ बेद राखे बिदित, पुरान राखे सारसुत, रामनाम राख्यो, अती रसना सुघरमें ॥ हिंदुनकी चोटी, रोटी

**राखी है सिपाहीनकी, कांधेमें जनेउ राख्यो, माला राखी गरमें ॥ मीड राखे मुगल, मरोड राखे पादशाह, वैरी पीस राखे, वरदान राख्यो करमें ॥ राजनकी हद्द राखी, तेगबाल शिवराज, देव राखे देवल, स्वधर्म राख्यो घरमें ॥**

**शिवाजी**—सरदारादि पौरजनहो, अविंधी जुलमाचा प्रतिकार करून, महाराष्ट्राचं साम्राज्य प्रस्थापित करण्याला परिस्थितीनं आम्हाला उद्युक्त केलं आणि त्या बाबतींत तुम्ही सर्वांनीं ऐक्यानं आम्हांला जी मदत केली त्या बद्दलचं श्रेय आज हें सिंहासन अशा तऱ्हेनं सर्वांपुढें अवतीर्ण झालं आहे. सध्यांच्या वर्तनाप्रमाणेंच सर्वांनीं ऐक्यवृद्धींत आपला क्रम चालू ठेवल्यास, हें राज्यपद यावच्चंद्रदिवाकरौ आपणां सर्वांचं आभारी राहून, आपणां सर्वांना सुख मिळणार आहे. आमच्यांतले कांहीं लोक सध्यां बलात्कारानं आणि इतर कित्येक आकर्षणिक गोष्टींनीं आज आमच्यांतून मुसलमानी धर्मांत गेले आहेत. तेव्हां आजचा हा आपला आनंदाचा आणि कधीं न उगवणारा असा शुभ दिवस मानून, ह्याच दिवसाच्या आज्ञेच्या प्रायश्चित्तानं त्यांनां स्वजातींत घेण्याचा आमचा इरादा आहे. त्या अन्वयें आमचे मुख्य प्रधान पेशवे—आमचं आज्ञापत्र वाचून दाखवतीलच आणि ह्या गादीचे अष्टप्रधान, आमच्या प्रमाणेंच ह्या सिंहासनाशीं एकदिलानं, स्वकर्तव्यमहत्वानं आणि मित्रभावानं आपली कामगिरी यथातथ्य चालवण्याच्या, आपणां सर्वां देखत शपथा घेतील आणि आमच्या प्रमाणेंच युवराज संभाजीरावांशीं योग्य वर्तन ठेवून, जगांत धन्य होतील अशी आमची पूर्ण खात्री आहे.

**पेशवे**—आजपर्यंत ह्या गादीची जी एकनिष्ठपणें सेवा केली त्याचंच फल पंतप्रधान पेशवे हा हुद्दा मला मिळाला असून सिंहासनाच्या उजवीकडचं पहिलं स्थान मला मिळालं आहे.

माझं जें दिवाणगिरीचं काम तें मी, आजपर्यंत चालवलं त्याच प्रमाणें पुढें चालवीन अशी ह्या गादीची शपथ घेऊन महाराजांचं आज्ञापत्र सर्वांना वाचून दाखवतों.




स्वस्तिश्री राज्यभिषेक शिवशक १ ज्येष्ट शु० १३ क्षेत्रीये कुलावतंस श्री

राजा शिवाजी छत्रपती स्वामी याणीं समस्त ब्राह्मण वेदपाठी व गृहस्थ व क्षेत्रीय मंडळी तथा प्रभुगृहस्थान व वैश्यज्ञाती व शूद्रादी लोकान तथा जमेदार व वतनदार व रयेत वगैरे सर्व ज्ञाती हिंदु महाराष्ट्रान तथा महालानिहाय व देश व तालुके व प्रांतानिहाय वगैरे येकंद्र आज्ञा केली ऐशीजे—हिंदुज्ञातींत अनादि परंपरागत धर्मशास्त्राप्रमाणें धर्म चालत आले असतां, अलीकडे कांहीं दिवसांत येवनी आमल जाहल्यामुळें ज्ञातींतील लोकांस बलात्कारें धरून भ्रष्ट केले व कितेक जागींचीं दैवतें जबरीनें छिन्नभिन्न केली. हिंदुज्ञातींत आहाकार जाहला—गाय ब्राह्मणां-सह धर्मउच्छेद होण्याचा समय प्राप्त जाहला—त्यावरून श्रीईश्वरी कृपेनें आमचे हस्तें श्रीसांबजीनें यवन वगैरे दुष्टांस शासन करऊन पराभवाते गेले व राहिले ते शत्रु पादाक्रांत होतील—परंतु लिहि-ण्याचें कारण कीं या सरकारांत राज्याभिषेकसमयीं क्षेत्रक्षेत्रादि क्षेत्रस्थ ब्राह्मण बहुत ग्रन्थ अनादि जमाकरून धर्मस्थापना जाहली—त्यांत कासीक्षेत्रस्थ सिष्ठ ब्राह्मणांत कांहीं तड पडून हलीं

ग्रंथ पाहतां भटजीकडून तफावत जाहली आहे-ठरले त्याजवरून शास्त्री पंडित व मुत्सदी व कारकुन यांस आज्ञा देऊन ज्ञातीविवेक व स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रिखंड अदिकरून महान ग्रंथीं निरणय सर्व ज्ञातीविशी जाहले आहेत ते वगैरे सर्व ग्रंथांनुमतें व जसे ज्याचे धर्म आनादि चालत आले त्या प्रमाणें निरवेध चालावे-जो कोणी द्वेषबुद्धीनें द्रव्यलोभास्तव, ब्राह्मणशास्त्रविरहित तंटे करून खलेल करील येविसी सरकारांत अर्ज करावा म्हणजे शास्त्राचे संमतें व रूढीपरंपरा ग्रंथ पाहून सरकारातून निरंतर निरमत्सरपणें धर्मस्थापना कोणाच्या उजूर न धरतां परानिष्ट जेव्हांचे तेव्हांच त्वरित बंदोबस्त होईल- हलीं येवन उत्तर देसीहून येत आहेत, तरी सर्व ज्ञातीनें येकदिल राहून खस्त मेहन करून सरकारची सेवा करून शत्रु पराभवाते न्यावा-यांत कल्याण तुमचे सरकारचेत ईश्वर करील जाणीजे.




**सेनापति**-तरवारीचं स्थान शक्तीप्रमाणें डावीकडेच असायचं. आमच्या धर्माची पायमल्ली करणाऱ्या यवनांस नामशेष करून टाकण्याकरतां परमकृपेनं, महाराजांनीं ही जी तरवार माझ्या हातीं दिली आहे तिचा उपयोग-मी एकपत्नीव्रतानं ह्या सिंहासनाच्या डाव्याबाजूच्या पहिल्या जागीं बसून यथायोग्य न्यायानं करीन ह्याच शपथेनं मी आपल्याला बांधून घेतों.

**पंतअमात्य**-पेशव्यांच्या शेजारच्या जागेचा अपमान न होतां मी आपलं जमाबंदीचं काम ह्या पवित्र सिंहासनाला स्मरून करीन.

**सुमंत**-सेनापतींच्या खालच्या पायरीची जीं परराष्ट्रीय

वकीलांशीं सद्युक्तीची भाषणं करणं तीं, सारासारविचारानं स्वराज्याच्या फायद्याची अशींच करण्याची आणि फंदफितुरी सारखे घोर अपराध न करण्याची मी ह्या सिंहासनाची शपथ घेतों.

**पंतसचीव**–पंतआमात्यांच्या जवळचंच जें माझं स्थान तें मजकडे कायम ठेवून घेण्याकरतां, स्वराज्यासंबंधींचं दप्तर आणि बारनिशी–त्यांची योग्य व्यवस्था बजावण्याच्या कामगिरीनं मी ह्या सिंहासनाच्या आज्ञेनं पुरा बांधला गेलों आहें.

**पंडितराव**–सुमंतांच्या शेजारीं बसण्याचा योग मला सुदैवानंच प्राप्त झाला असून, धर्मोपदेशविषयक ज्या गोष्टी–त्यांच्या आदरानं मी ह्या राज्यांत–ह्या सिंहासनाची इभ्रत राहील असंच वर्तन करीन.

**मंत्री**–पंतसचीवांच्या शेजारींच माझं स्थान असल्यामुळें मी त्यांच्याच सल्यानं, स्वराज्यांत केव्हांही अन्नाची तूट पडणार नाहीं असा हुजुरातीचा आणि कोठीचा बंदोबस्त ठेवीन अशी ह्या सिंहासनासमोर प्रतिज्ञा करतों.

**न्यायाधीश**–कोणचाही तंटा असो, त्याचं बीज हरएक तऱ्हेचा व्यापार हेंच होय. त्याचा निकाल लावून–घेण्याकरतां दोन्ही पक्ष आपापल्यापरी राजाच्या न्यायमंदिरांत येतात. त्यां पैकीं कायद्याच्या अन्वयें खरा गुन्हेगार शोधून त्याला योग्य दंड करण्याचं जोखम माझ्यावर महाराजांनीं घातलं आहे. मी पंडितरावांच्या शेजारींच असल्यानं त्यांच्या साह्याच्या खऱ्या शास्त्राधारानं–ह्या सिंहासनाची खरी इभ्रत राहील असेच न्यायनिवाडे राज्यांत करीन.

**शिवाजी**–पौरजनहो, निंदक काहीं म्हणोत, शत्रु दांत खावोत किंवा परोत्कर्ष–असहिष्णु ह्या सिंहासनाकडे पाहून कष्टी होवोत–त्या सर्वांच्या कृती नजरेआड करून, आम्हीं आपल्या जन्माचा

हेतु पूर्णपणें ओळखून, कोणाचीही मदत नसतां, ह्या आमच्या शूर, धाडसी, एकपत्नीव्रताच्या दोस्तांच्या साह्यानं आणि आपणां सर्वांच्या ऐक्यानं आज हें महाराष्ट्राच्या साम्राज्याचं सिंहासन प्रस्थापित केलं आहे. ह्याचे झेंडे सर्व पृथ्वीवर नाचवून मराठी भाषा सर्वत्र करण्यास आपणां सर्वांनीं एकदिलानं झटलं पाहिजे. ह्या समयीं ह्या कार्यांत समर्थांच्या वाणीचा बोध घ्यायला जर सांपडता तर बहार झाली असती. (पडद्यांत रामदास)

**श्लोक.**

जया युक्तिची वासना पूर्ण आहे ॥
तयाची गुरूचे पदीं वृत्ति राहे ॥
लयें लक्षितां तें स्वरूपीं सरावें ॥
स्वयें ज्योति पूर्ण प्रकाशे स्वभावें ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ!

(वामनपंडितांसह रामदास एकदम पुढें येतात. सर्व उठून उभे राहतात व शिवाजी, सईबाई आणि संभाजी त्यांच्या पायां पडतात व हार घालतात तेव्हां वामनपंडित पुढील श्लोक म्हणतात.)

**वामन— श्लोक.**

जनाकारणें देव लीलावतारी ॥
बहूतांपरी आदरें वेषधारी ॥
तया नेणती ते जनीं पापरूपी ॥
दुरात्मे महा नष्ट चांडाळ पापी ॥ १ ॥

**रामदास**—अहाहा, काय हें आम्हां मराठ्यांचं वैभव! प्रत्यक्ष इंद्रपुरीच ही! शिवराज, तुमच्या जन्माचं सार्थक आज झालं. गोब्राह्मणप्रतिपालाचं छत्र आज उभारलं गेलं. हीं तुमची स्वच्छ कीर्तिदर्शक शुभ्र छत्रचामरं, आज यवनांच्या डोळ्यांपुढें आपल्या विजयी स्वरूपानं फडकूं लागलीं. ह्यांच्या आश्रयाला जों पर्यंत तुमचं खरं रक्त कोणच्याही देहांत खेळत राहील, तोंपर्यंत ह्या सिंहासनाला यवनांच्या शक्तीचा स्पर्श होण्याची भीतीच नाहीं. हें आमचं मराठ्यांचं साम्राज्य जितक्या उदात्त तत्वांवर

स्थापन झालं आहे-तितकं पुढें कधींही होणार नाहीं. आमचं वर्चस्व कबूल करून, आम्हांला प्रतिवर्षी खंडणी मिळाली असतां, आमच्या मांडलिकांच्या कोणच्याही राज्यव्यवस्थेंत विनाकारण-स्वार्थाकरतां ढवळाढवळ करून-त्यांचं स्वातंत्र्य नष्ट करण्यानं त्यांनां गुलाम करून सोडण्याइतकं आमच्या साम्राज्याचं अनुदात्त तत्व नाहीं हें प्रत्येकानं लक्षांत ठेवलं पाहिजे.

**शिवाजी**-महाराज, आपल्या सारखे परीक्षक आणि योजक वैद्य मिळून, ह्या भवानी सारखी पोलादिमात्रा जवळ असल्यामुळेंच, यमराजाच्या हद्दीवर जाऊन पोंचलेल्या स्वातंत्र्याला त्या कुबडीच्या साह्यानं परत आणून, महाराष्ट्रधर्माच्या पथ्यानं सुदृढ करतां आलं. तेव्हां ही सर्व कृपा आपलीच आहे. रजोगुणी अर्जुनाकडून भगवंतांनीं जें करवलं तेंच आपण मजकडून करवलं. त्याचाच हा आजचा दिवस ह्या महाराष्ट्रीयांच्या खऱ्या आनंदाचा सूर्यप्रकाश आहे. म्हणून हा दिवस ह्या भरतभूमीच्या ह्या सतराव्या शतकाच्या इतिहासांत कांहीं विशिष्ट हेतूनं लिहिला जावा अशा तऱ्हेची समर्थांची सेवा ह्या महाराष्ट्रीयांच्या कडून प्रलयकाल पर्यंत घडत राहील अशी देणगी द्यावी आणि दासाला धन्य करावा.

**रामदास**-शिवाजी राजे, ह्या उच्च आणि उज्वल सिंहासनावर चढून जाण्यास तुम्हांला रामनामाच्याच पायरीची खरी मदत झाली असल्यामुळें, तें रामनाम आजपासून पत्रव्यवहारांत आणि एकमेकांच्या भेटीच्या वेळीं 'जय हरा'च्या ऐवजीं 'राम राम' असं तुमच्या मराठी राज्यांत सुरू करण्याची आज्ञापत्रं सोडून, तुमच्या नावाचं नाणं चालू करावं म्हणजे तुमचा आणि सर्व महाराष्ट्रीयांचा इच्छित हेतु पार पडणार आहे. शिवबा, तुम्ही आतां पुन्हां स्वस्थानीं विराजमान होऊन, ह्या महाराष्ट्राचे राजे कसे शोभतां तें आम्हांला पाहूं द्या. (शिवाजी बसल्यावर रामदास स्वस्थानीं बसून)

अहाहा, काय ही शोभा आणि केवढा हा आनंद ! ह्या महाराष्ट्रलक्ष्मीचं ग्रहबल अतर्क्य खरंच. वामन स्वामी, तुमचं ज्योतिष ह्या वैभवासंबंधानं काय म्हणतं ?

**वामन**–ह्या मराठ्यांच्या साम्राज्याच्या सिंहासनाचा जन्म मिथुन लग्नांत मार्तंड–मंडलोदयामध्यें झाला असून, पराक्रम-स्थानीं साक्षात् श्री मारुतीअवतार रामदास समर्थ रविरूपानं बसल्यामुळें, सुखस्थानांतल्या स्वक्षेत्रींच्या बुधरूप सांबअवतार श्रीशिवराजांच्या मदतीनं, भूमीचा पूर्ण उद्धार झाला. पंचम स्थानच्या स्वक्षेत्रांतल्या शुक्ररूप शक्तीचं शिवराजाला पूर्ण साह्य असल्यामुळेंच, वृत्रासुराला जिंकण्याला इंद्र जसा असमर्थ झाला त्याचप्रमाणें प्रत्यक्ष काशीविश्वेश्वराला पळवून लावणाऱ्या अवरंगजेबादि यवनांना, शिवराजाला पादाक्रांत करणं अशक्य होऊन, षष्ठमस्थानीं स्वगृहांत विजयी मंगळरूप भगवा झेंडा अवतीर्ण झाल्यामुळें यवनांचा बराच संहार होऊन, महाराष्ट्राच्या क्षितीजावर भगवा झेंडा फडकूं लागला. सप्तम-स्थानीं साक्षात् बृहस्पति उदय पावल्यामुळें परमपूज्य आणि विश्वसनीय अशी श्रेष्ठ भार्या, स्नेही, नोकर, किल्ले, अश्व, गज–वगैरेनीं ही भूमी अमरपुरीला लाजवणारी होऊन, संभाजी सारख्या रणशूर, परंतु एककल्ली युवराजाला जन्म देती झाली. रावणासारख्या चवदा चवकड्यांच्या राजाला ज्यानं आपलं क्रौर्य दाखवून रसातळाला नेलं, तो शनी ग्रह, नवमस्थानांत स्वगृहीं बसल्यामुळें, भवानी खड्गानं आपली उज्वल कीर्ति अमर केली आणि एकादश स्थानांत उच्चीचा चंद्र मित्रगृहांत असल्यामुळें कुबडीरूप जिजाबाईच्या आशीर्वादानं लाभस्थान दुर्योधनाप्रमाणें दशगुणित होऊन सद्व्ययी झालं. असा हा ह्या महाराष्ट्राचा ग्रहयोग उत्पन्न झाल्यामुळेंच छत्रपतित्वाचा योग स्थापित झाला आहे. आजचा हा महाराष्ट्रीयांचा स्वातंत्र्यांतला आनंदरवी उदय पावून–यवनांच्या राज्यांत–उसन्या ऐश्वर्याच्या चंद्र-प्रकाशाचाही अस्त होऊं लागला आहे.

**शिवाजी**-ही सर्व कृपा समर्थांची आहे. मला मिळालेल्या उपदेशाप्रमाणें स्वजन्मकारण मी ओळखून आजपर्यंत चालत आलों तसाच पुढें चालेन. प्रत्येक महाराष्ट्रीयानं भगवद्वचनाप्रमाणें स्वजन्माचा उद्देश ओळखून वागण्याचं मनांत आणलं तर इच्छित हेतु पार पडण्याला कांहींच हरकत पडणार नाहीं. कारण परमेश्वर हा सर्वांचा साह्यकारी असल्यामुळें—

**श्लोक.**

**सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ॥**
**उडी घालितो संकटीं स्वामि [illegible] ॥**
**हरी-भक्तिचा घाव घाली निशाणी ॥**
**नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ १ ॥**

**रामदास**-शिवाजीराजे, वेदांविषयीं पोकळ बडबडण्यांत रमलेले, दुसरं कांहींच नाहीं असा वाद घेणारे, का[illegible] धरून कर्म करणारे, स्वर्गभोग हेंच सर्वस्व मानणारे असे [illegible] मूढलोक-ते ऐश्वर्यभोगाकडेसच लक्ष्य ठेवतात आणि ज्या कर्मांचं फल पुनर्जन्म आहे असलीं अनेक कर्मे करण्याच्या गोष्टी फुलवून सांगतात. परंतु त्यामुळें भोग आणि ऐश्वर्य यांत गुंग झालेल्यांच्या मनाची एकाग्रता होण्याला-दृढप्रवृत्तीची बुद्धि त्यांनां सोडून जाते. सत्व, रज, तम ह्या तिहींनां अनुलक्षून वेदांच्या आज्ञा आहेत; परंतु ह्या तिहींच्या पलीकडे आपण राह्यलं पाहिजे. सुखदुःखादि परस्परविरुद्ध विकारांपासून मुक्त झालं पाहिजे. धैर्य धरून चिंता सोडली पाहिजे आणि जागृतीनं सर्व व्यवहार केले पाहिजेत. प्राण्याचा अधिकार कर्माच्या ठायीं असून फलाच्या ठायीं नाहीं. सिद्धि आणि असिद्धि या दोहोंत जो समबुद्धि ठेवतो तोच योगी! कर्माला ज्ञानाचा आश्रय जरूर लावला पाहिजे. ज्ञानावांचून केवळ फलाच्या हेतूनं कर्म करणारे ते दीन होत. ज्ञानी पापपुण्यापासून मुक्त होतो. म्हणून कर्माच्या ठिकाणीं कौशल्य म्हणजे ज्ञानाची योजना हाच योग. ज्ञानी कर्मांच्या






फलाची आसक्ति सोडून जन्मबंधनापासून मुक्त होतात. वेदां-तली स्तुत्यर्थ वाक्यं ऐकून विक्षिप्त झालेली बुद्धि निश्चल होऊन समाधानवृत्तींत जेव्हां स्थिर होते, तेव्हांच योगाची प्राप्ति होते. मनांत उद्भवणारे सर्व विकार सोडून आपल्याच ठिकाणीं जो संतुष्ट असतो तोच स्थितप्रज्ञ जाणावा. मनुष्य विद्वान असून जपून जरी वागत असला तरी इंद्रियं भारी उचंबळ–तीं त्याचं मन बळंच ओढून नेतात. त्या सर्व इंद्रियांना आवरून परमेश्वरावर विश्वास ठेवावा आणि समबुद्धीच्या योगानं वागावं म्हणजे तो स्थिरबु[illegible]. जो म[illegible]ष्य विषयांचं चिंतन करतो त्याची त्यां[illegible] ठिकाणीं [illegible]सक्ति उत्पन्न होते. आसक्तिमुळें इच्छा उत्पन्न होते. इच्छेला प्रतिबंध झाला म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून संमोह होते. संमोहापासून स्मृतीला भ्रंश होतो. भ्रंशानं बुद्धि नष्ट होऊन सर्वस्वाची होळी होते. इंद्रियांना रागद्वेष[illegible] सोडवून, मन आवरून जो विषयांत वागतो त्याला[illegible] चित्ताची प्रसन्नता प्राप्त होते. अशा तऱ्हेच्या ज्याला योग नाहीं त्याला बुद्धि नाहीं. ज्याला बुद्धि म्हणजे भावनाध्यान नाहीं त्याला शांति नाहीं. ज्याला शांति नाहीं त्याला सुख कुठलं असणार ? म्हणून सुखाला शांति पाहिजे. शांति मिळवण्याला मीपणा आणि माझेपणा सोडला पाहिजे. ही ब्राह्मी स्थिति अंतकाळीं जरी प्राप्त झाली, तरी हिच्यामुळें ब्रह्मांत सहज मिळून जातां येतं. म्हणून प्रत्येकानं, आपला प्रकृतिगुण ओळखून जन्मसाफल्य केलं पाहिजे.

शिवाजी–तथास्तु महाराज ! ( पायां पडतो. )

सर्व– श्लोक.

देह–त्यागितां कीर्ति मागें उरावी ॥
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचे परि त्वां झिजावें ॥
परी सज्जनां अंतरीं नीववावें ॥ १ ॥

जयजय रघुवीर समर्थ । ( पडदा पडतो. )

समाप्त.